Sow. T. R. Malati Bai.

श्री गोपालकृष्ण: प्रसन्नोस्तु.

# श्रीमद्गीतगोविंदप्रारंभः



मंगलाचरण.

पद.

चाल—( पंचतुंड नरकंडमालधर पार्वतीश आधी नमता. )

प्रथमारंभीं पद्मावतिपति पंडितवर जयदेवमहा ॥ भक्तशिरोमणि वंदन करितों मंगलचरितालागि पहा ॥ध्रु०॥ गीतगोविंदाभिधरचितों हें सुगम बालबोधार्थासी ॥ प्राकृतभाषेमाजि मनोरम सकलातें श्रुत व्हायासी ॥ प्रथमा० ॥ १ ॥ राधामाधव सुरतकेलिचा प्रथमविजय हा वाखाणी ॥ ज्याच्या स्मरणें तरती प्राणी स्वर्गीं सुरवरसन्मानी ॥ प्रथमा० ॥२॥

( कोणे एके समयीं यमुनातटाकाचे ठायीं सकल गोपांचा नायक जो नंद तो आपल्या सुकुमार कृष्णासहित प्रवाहाची शोभा अवलोकन करीत असतां अस्तमान जाहला. त्या कालीं वृषभानुनंदिनी जी राधा, तिजप्रत भाषण करितो. )

पद.

चाल—( काय मला भूल पडलि आज हरपलें. )

नंद म्हणे राधिकेसि वचन आयके ॥ अस्तमानसमय असे बोलतों निकें ॥ ध्रु० ॥ साभ्र गगन केवि आतां वरति दाटलें ॥ कानन भूवृक्षयोगें श्याम थाटलें ॥ पर्वत हे सकल तसे भासती भले ॥ रजनीचा हरि भ्याड बघुनि नच टिके ॥ नंदम्हण ० ॥ १ ॥

हे मृगलोचने राधे, तूं या कृष्णास स्वगृहास घेऊन जा.

## पद.

चाल—साध्य नसे मुनिकन्यां ॥ परि मन वेडें ऐकत नाहीं )

घेऊनि जागे गृहासी ॥ राधे हा ममतनय मनोरम ॥ध्रु०॥ कोमल श्यामल मन्मथ मूर्ती ॥ दर्शन होतां कामाचि पुरती ॥ सुरवरनरमुनि करिती आरती ॥ चाल ॥ भावें दिन रजनी ॥ राधे हा मम तनय मनोरम घेऊनि जागे गृहासी ॥ राधे० ॥ १ ॥

## पद.

चाल—) नंद गृहाच्या जवळि मुलींनो दिसतो रथ दु० )

अभ्रानें हें गगन भरिलें धरणी ही काळी जहाली ॥ धर० ॥ ध्रु० ॥ तमालद्रुमाचेठायीं यामिनी ॥ जाहलि म्हणुनि हरि सभय असे मनीं ॥ थरथर कांपत, हे मृग लोचनि ॥ चाल ॥ राधे ने सदनीं ॥ नंद म्हणे ॥ राधे० ॥ १ ॥ सप्रेमानें या परि वदतां ॥ मार्गीं चालति तिथुनि उभयतां ॥ यमुना तीरीं करिती सुरता ॥ दिक, क्रीडाती सुखदहा ॥ २ ॥

## ॥ घनाक्षरी. ॥

॥ वेदशास्त्ररूप जाण ॥ वाग्देवताप्रमाण ॥ तेणें युक्त अंतःकरण ॥ असे ज्याचें सर्वदा ॥ १ ॥ सिंधुतनया सेवन करित ॥ तेणेंकरुनि भूपनाथ ॥ चक्रवर्ती म्हणवीत ॥ नृपापरि सभाग्य तो ॥ २ ॥ ऐसाजगतीवरि महान ॥ जयदेव गुणनिधान ॥ पंडित भक्तराज जाण ॥ कवि प्रसिद्ध निश्चयें ॥ ३ ॥ राधामाधव केलि सुरत ॥ कथन करितो भावयुक्त ॥ ग्रंथ रचितो रसभरित ॥ तोषवाया रसिक जनां ॥ ४ ॥

## ओंवी.

॥ विद्यालक्ष्मी परिपूर्ण ॥ आहे संपन्न यांहीं करून ॥ मी पंडित यथा ज्ञान ॥ कृष्णकथा वर्णितों ॥ १ ॥

यानंतर कवि आपल्या ग्रंथाचें प्रयोजन दर्शित करितो.

## ॥ दिंडी. ॥

याच अर्थें बहुमधुर कोमला हीं ॥ रसालंकृत सामुग्रि रम्य पाही ॥ स्वयें पदपंक्ती बसे जिचे ठायीं ॥ अन्यग्रंथाहुनि चमत्कार तोही ॥ १ ॥

यानंतर कवी इतर कवींपेक्षां आपल्या कवित्वाच्या असाधारण गुणाचें स्तोत्र करितो. उमापतिधर नामक कवि शब्दशास्त्रांत निष्णात असून अर्थविस्तार करितो. जयदेव कवि शब्द रचनेविषयीं विशेष चमत्कार जाणतो, शृंगारशास्त्रांत आचार्य गोवर्धननामक कवीसारिखा अन्य कोणीच विख्यात जाहला नाहीं. धोयीनामाचा कवी श्रवण करितांच ग्रंथरचना करितो. आतां जयदेव कवि मंगलात्मक दशावतारांचें वर्णन करितात.

## पद.

चाल—( वाहवा थोर तूं भूपाळा ॥ खासे ठकविलेंस मु० )

हे जगदीशा मीनाकृति तनु धारण करुनी सारे ॥ प्रलयसागरीं दैत्या निवटुनि आणेसि वेद माघारे ॥ दिधले ब्रह्मयासी साच ॥ हारेला सकळांचा जाच ॥ १ ॥ नौका सागरतारक वेद हि कर्मप्रतिपादक हे ॥ संसृतितारक भवभयहारक आणिसि तूं लवलाहे ॥ जयजय देवाजगदीशा ॥ पुरवी दीनांची आशा ॥ २ ॥

## श्लोक. ( कामदा. )

कूर्मरूप तूं केशवा हरी ॥ वाहसी कसी मेदिनी, वरी ॥ पृष्ठिच्या स्वयें सौख्यदायका ॥ भो दयानिधे लोकपालका ॥ १ ॥

## ठुंबरी. ( पंजाबी. )

चाल—( मोहनरसिया आये बगियामो-फूल. रही सब० )

आदिसुकरतनु धारण करुनि केशव नटला जगिं परमात्मा ॥ धृ० ॥ चंद्रामाजीं कलंक रेखा त्या परि रदनावरती वसुधा आदिसुकर० ॥ १ ॥ शोभे सदोदित शुभ्रपणानें धन्य धन्य ती नच भय बाधा ॥ आदि० ॥ २ ॥

## पद.

चाल—( श्रीहरिच्या वेणुनादें मन माझें मोहिलें. )

भक्तांस्तव रूप घेसी नरकेसरि केशवा ॥ संकष्टीं तारायातें धांवसि तूं माधवा ॥ धृ० ॥ हस्तरूप कमलिं शोभे नख शृंग अद्भुत ॥ त्या शस्त्रें मर्दियेला कश्यपसुत निश्चित ॥ प्रऱ्हादा रक्षियेलें दाऊनि रुप विपरित ॥चाल॥ नख महिमा सुखद ऐसा प्रियकर हो शांभवा ॥ भक्तास्तव० ॥ १ ॥

## पद.

चाल—( अभाग्याचे घरीं रे बाबा कामधेनु आली. )

हें अद्भुत रुप वामन विक्रमिं छळिसी नृपबलिला ॥ त्रिपाद भूमी दान मागुनी करिसी सुखलीला ॥ धृ० ॥ तव पद कमलापासुनि गंगा सदया उद्भवली ॥ चौदा भुवनें पवित्र झालीं हे प्रभु वनमाळी ॥ हे अद्भुत रुप ॥ १ ॥

## साकी.

हे केशव धृतभार्गवरूपा क्षत्रिय मर्दुनि सारे ॥ तद्रक्तानें केलि सिक्त भू कार्त्तवीर्य संहारें ॥ जयजय विभो परशुरामा ॥ जयजय केशव सुखधामा ॥ २ ॥

## दिंडी.

राम लक्ष्मण कैकयी कुमर झाला ॥ स्वयें नामें विभु

भरत सौख्यभेला ॥ दुष्ट राक्षस रणि वधुनि रावणाची ॥ शिरें दिधलीं दशादिशां प्रती साची ॥ ३ ॥

## अंजनीगीत.

हे केशव धृतहलधररूपा ॥ भो बलिरामा पूर्णप्रतापा ॥ नीलांबर तूं लेउनि तापा वारिसि भक्तांच्या ॥ १ ॥ तव हालाचे घावहि साहुनि ॥ कृष्णत्वें ती यमुना वसनीं ॥ प्राप्त जहाली कृष्णवर्णी ॥ कौतुक हें झालें ॥ २ ॥

## पद.

चाल—( घन:श्यामसुंदरा श्रीधरा अरुणोदय० )

बुध्दरूपधारका केशवा सदयहृदय असशी ॥ पशुहिंसा प्रतिपादक श्रुतिसी निंदाया झटशी ॥ धृ० ॥ पशुघातातें अठउनि खेदा करिसि दीनबंधू ॥ यज्ञकांड तूं अखंड निंदिसी जाणुनि संबंधू ॥ बुध्द रूप धारका केशवा० ॥ १ ॥

## पद.

चाल—( मसी बोलूं नको गिरिधारी ॥ वहु खोटा० ॥

हे धृतकल्किरूप वनमाळी ॥ केशव माधव नतजनवाली ॥ धृ० ॥ म्लेंछवधास्तव घेऊनि खड्गा ॥ कोपें मारिसि त्या अरिवर्गा ॥ हे धृत० ॥ १ ॥ धूमकेतु परि तेज जयाचें ॥ संघाचे निवटी रणिं यवनांचें ॥ हे धृत० २ ॥ जयदेवाचें भाषण ऐसें ॥ सुखकारक हे परिसा सरिसें ॥ हे धृत० ॥ ३ ॥

याप्रमाणें गोपाळकृष्णाच्या अंशावताराचें वर्णन केलें. पूर्णब्रह्म अवतार स्वयमेव श्रीकृष्ण परमात्मा होय असें जाणून जयदेव कवी त्यास वंदन करितात.

## पद.

चाल—( केशव करणी अद्भुतलीला नारायण तो कसा० )

मच्छरूपतें धारण करुनी निगमा उध्दारिलें ॥ हरिनें

कौतुक जगिं दाविलें ॥ धृ० ॥ कमठस्वरूपें त्या जगदीशें मेदिनिसी वाहिलें ॥ पृष्ठीवरि आपुल्या प्रेमें भलें ॥ आदि क्रोड निज स्वरूप धरुनि हरी कुंभिनितें उचलिलें ॥ निजदंष्ट्राग्रीं तिस बसविलें ॥ हिरण्यकशिपू दुष्ट दुरात्मा त्याणें बहु छळियलें ॥ सुतातें, म्हणुनी त्या मारिलें ॥ भार्गवरूपें सकल क्षत्रियां गाढुनि संहारिलें ॥ सुजनां गाया हें जाहलें ॥ राघव रूपा धारण करुनी रावणासि मर्दिलें ॥ लंकेहुनि जानकीस आणिलें ॥ बलिरामाचें स्वरूप धरुनी यमुनेतें कर्षिलें ॥ गोकुळीं चरित्र हें दाविलें ॥ सदयहृदय हरि बुद्धस्वरूपें करुणतें धरियेलें ॥ कर्मकांडातें धिःकारिलें ॥ कल्किस्वरूपें मेंच्छा पाहुनि खड्गानें मर्दिलें ॥ हरिनें भक्तास्तव आपुले ॥ दशावतारा धारण करिहरि तत्पद वंदुनि फुलें ॥ तुलसिदल अर्पण करितों भलें ॥ जयश्रीकृष्ण। पूर्ण परात्पर निगमें तुजगाइलें ॥ भावें ध्यानिं मनीं निरखिलें ॥ १ ॥

## पद.

चाल—( वारं बिभीषण बोलतसे ॥ एकुनि रघुविर० )

जयजयदेवा जगदीशा ॥ जयहरि जयश्री परमेशा ॥धृ०॥ तें स्तनमंडल कमलेचें ॥ सेविसी स्वकरें करुनि साचें ॥ फांकलें तेज कुंडलांचें ॥ गळां वनमाळा सुख त्याचें ॥ चाल ॥ घेसि असा तूं भूषित प्रभुवर कृष्णा अमरेशा ॥ जय० ॥ १ ॥ तव तेजें रवि हा गगनीं ॥ झळके चंद्रहि तो भगणीं ॥ तारक तूंचि जन्ममरणीं ॥ गमासि मज भवाब्धिची तरणी ॥ चाल ॥ भो मुनिमानस-राजहंस तूं जयजय भयनाशा ॥ जय हरि जय श्री परमेशा ॥ २ ॥ कालियफणिपतिमदशामना ॥ जय

जय कृष्णा मृगनयना ।। अनमनरंजनसुखसदना ।। यदुकुळभूषण श्रीरमणा ।। चाल ।। भोयदुकुलमणि पूर्ण परात्पर-चुकवी यमपाशा ।। जय हरि जय श्री परमेशा ।। ३ ।। मधुमुरनरकासुरमथना ।। जय जय केशव खग वहना ।। सुरकुलकेली निज सदना ।। सुरवरतारक खलदमना ।। चाल ।। सकल सुरांचा त्रास हराया धावसी हृषिकेशा ।। जय हरि जय श्री परमेशा ।। ४ ।। सुंदर कमलापरि नयन ।। ज्याचे शोभति परिपूर्ण ।। हे भव मोचन सुख भवन ।। करिसी भक्तांचें अवन ।। चाल।। अंगमनिगम तुज, स्तविती देवा तोडी भवपाशा ।। जय हरि जय श्री परमेशा ।। ५ ।। आपुल्या हृदयिं जानकीनें ।। भूषण केला सन्मानें ।। वधिला दूषण खल जेणें ।। जिंकुनि समरीं कोपानें ।। चाल ।। घोर संगरीं रावण मथिला, राघव कोसलेशा ।। जय हरि जय श्री परमेशा ।। ६ ।। अभिनव जलधरवर्ण हरी ।। श्यामसुंदरा दनुजारी ।। मंदर धरिला पृष्ठिवरी ।। श्रीमुखचंद्र चकोर परी ।। चाल ।। लंपट होसी मदनमोहना नुरवी अघलेशा ।। जय हरि जय श्री परमेशा ।। ७ ।। भो तव चरणाचे ठायीं ।। वंदन करितों लवलाही ।। भद्र करी शरणागत तेही ।। सुखकर तुजविण अन नाहीं ।। चाल ।। वृष्णि कुलोद्भव, मन्मथ जनका, पाव अमरेशा ।। जय हरि जय श्री० ।। श्री जयदेव कवी बोले ।। हर्षे हृदयीं बहु डोले ।। मंगलाचरणगीत केलें ।। परिसा नित्य भक्त भोळे ।। चाल ।। भवभयनाशन-सद्यश वर्धन-पूरित अखिलाशा ।। जय हरि० ।। ९ ।।

या नंतर जयदेव या ग्रंथाच्या श्रोतेजनांस आशीर्वादात्मक गीत रचितो.

## पद.

चाल—( बघुनि उपवना० ) अथवा मुशाफर )

हे प्रिय जन हो, मधुसुदनाचें, वक्षस्थळ, तुमचें ॥ अभिलाषितांतें पूर्ण करो तें कैसें सुख त्याचें ॥ धृ० ॥ कथितों आतां, रमाकुचाग्रीं, अलिंगनें करुनी ।। भगवंताचें वक्षस्थलही, कुंकुमरागांनीं ॥ सदावर्तलें आहे मनोरम पूर्ण करो वचनीं ॥ केलि प्रकट जणु अनुरागाचे ठायिंच काय जनीं ॥ अंतरंगिची कमळा प्रीति कुंकुमयोगें गुणी ॥ चाल धुमाळ ॥ जाणो प्रकट बाहिर यायोगें पावन ॥ अंतःपुरीं खेळतो मन्मथ तो आपण ॥ या खेदें करुनीं सघर्मउरावरि कण ॥ चाल० ॥ जलरूपानें वाहे ऐसी राधा रूप मा चें ॥ आलिंगनानें हर्षित झाला माधव वदुं वाचे ॥ हे प्रियजनहो ॥ १ ॥

या प्रकारचा सकल कलाकांलियुक्त अनंत कोटि ब्रह्मांडनायक गोपालकृष्ण याची प्रार्थना आपल्या कल्याणाकारितां करितात. एके समयीं राधिका श्रीकृष्ण विरहेंकरून व्याकुळ होत्सातीं सखीच्या द्वारें शोध आणविते. त्या कथेचें वर्णन करितात.

## पद.

चाल—( सेजमंचकीं व्यर्थ राहिलों. )

ऋतु वसंत हा पसंत भासला ॥ उसंत घ्यावयासि सुखें समय साधिला ॥ धृ० ॥ कुसुम माधवी मृदुल चांगलें ॥ तदुपरी बहुतसार.-सुकुमार,-सुबक फार, करपदादि ते ॥ कामिनी असी-विरहिराधिका ॥ भ्रमे वनांत, हरिमनांत, मनजनांत, न च वसे कदा ॥ लक्ष लागलें, हरिरुपाकडे ॥ चतुर नार, शहाणि फार, वारंवार कृष्ण चिंतनीं ॥ सावध नित असे. मधुर भाषणें ॥ बाहुनि सखी

म्हणे तूं निरखि, करि मज सुखि कृष्ण आणूनी ॥ जाच होतसे, मदन जाळितो ॥ आणि अनंत वाटलि खंत करवि शांत अंत समय हा ह्मणुनि बोलिलें ॥ उसंत घ्यावयासि० ॥ १ ॥

राधेप्रति सखीचें भाषण.

## पद.

चाल—( अभाग्याचे घरीं रे बाबा कामधेनु आली० )

सरस वसंतीं माधव खेळे युवति जना सहित॥ कालिंदी तटिं कुंजद्रुमतळिं साखि सांग वृत्त ॥ धृ० ॥ नवयौवन त्या बल्लवयुवती घेउनि सांगातीं ॥ गीत नृत्य हाव भाव करी हरि वेद जया गाती ॥ सरस० । १ ॥ वसंत ऋतुचें वर्ण परिसा सपल्लव तरु ते ॥ सुंदर लवंग वेली बघतां सुखकर मन रमतें सरस० ॥ २ ॥

## इंद्रसभा.

चाल—( सुनरे मेरे देवर० )

पसंत ऋतु वसंत पहा । उन्मद मदनास ॥ प्रकट आहे हर्ष काम ॥ मनिं बहु उल्हास ॥ १ ॥

पथिकजन प्रवासिं वसे ॥ कामिनि गृहिं जाण ॥ पति सुख मनिं आणुनि, विरह ॥ मानिति अपमान ॥ २ ॥ शोक-भर विलाप करिति ॥ साश्रु नेत्रबाण ॥ भ्रमरसमुदाय व्याप्त ॥ कुसुमसमुह मान ॥ ३ ॥

## साक्या.

पुष्पावरुनी भ्रमर समुह बहु गुंजारव तें करिती ॥ सुगंध मंडित तमालतरुवर वासंती वनिंडुलती ॥ होते युवजन हृदयाचें ॥ विदारण महद्दुःख त्याचें ॥ २ ॥ मन्मथ शार्दुळ स्त्रीपुरुषांतें तीक्ष्ण नखें बहु छळितो ।

पलाश पुष्पें फुललीं वसंतीं चमत्कार हा दिसतो ॥ रतिपति छत्रपती राय ॥ तद्यश वाणावें काय ॥ ३ ॥

## श्लोक.

( कामदा चालीवर. )

नागचंपका पुष्पें दाटलीं ॥ तैं सुगंधिता होय पाटली ॥ भृंग त्यावरी येउनि बैसले ॥ स्वाद घ्यावया जाणिजे भले ॥ १ ॥ स्मरनिषंग तो फार शोभतो ॥ गुच्छ पाटली पुष्प संघ तो ॥ दर्शनें नरा स्त्रीस त्या परी ॥ पाहुनी घडे विरह अंतरीं ॥ २ ॥

## पद.

चाल—( गुलफाम मुझे है प्यारा । मुझे छांड चला० )

वासंतिपुष्प सौगंधें ॥ उद्यान सकल दुमदुमिलें ॥ नूतना विविध पुष्पांच्या ॥ पंक्तिनीं बहुत शोभियलें ॥ मुनिमानस मोहन करितो ॥ युवयुवती लागुनि पाहिले ॥ मित्र ऐसा ऋतु वसंत ॥ वाटला बहुधा पसंत ॥ सज्जन हा द्यावि उसंत ॥ १ ॥ स्फुरताति वेलि सुखखाणी ॥ वासंति लता रसभरूनी ॥ आलिंगन वृक्षां करूनी ॥ सर्वांगिं व्याप्त कलिकांनीं ॥ रोमांच दाटले गहनी ॥ पाहताति लोक ते नयनीं ॥ च्यूतवृक्ष लागले रानीं ॥ वृंदावनानिकट सुखखाणी ॥ कालिंदी पूत जलानी ॥ निर्मळ गहनीं हरि श्रीमंत ॥ रासक्रीडा करितो बहुत ॥ मित्र ऐसा ऋतु वसंत ॥ वाटला बहुधा पसंत ॥ २ ॥

## साकी.

श्री जयदेवें वर्णन केलें ऐसें सरस वसंतीं ॥ प्रकाशमय तें वर्णन हरिपद-चिंतन ज्याचे अंतीं ॥ होतें सद्भावें जाण ॥ त्रिजगीं अघटित महिमान ॥ १ ॥

## दिंडी.

प्रेमभावानें एकतांचि लीला ॥ होइ पापाचें दहन मोक्ष-भला ॥ प्राप्त होतें स्मरस्फुरण मानवातें ॥ सुखें यास्तव हरि भजा निदानातें ॥ २ ॥

## पद.

चाल—( वाहवा थोर तूं भूपाळा ॥ खासें ठकविलेंस क्र० )

वाहवा बहार वसंताची ॥ दिसते शोभा बहु त्याची ॥ धृ० ॥ कांहीं प्रफुल्लित वाल्लिमल्लिका चंचत्पराग जीचे ॥ तेजोमय अति कुसुमरसामधि असती निमग्न साचे ॥ वाहवा० ॥ १ ॥ सुगंध चूर्णाचें रजामिश्रित प्रकट करुनि विपिनातें ॥ व्याप्त होउनी घनवटले तायें बघतां तोष मनातें ॥ वाहवा० ॥ २ ॥ सुखकर प्रियकर पुष्पकेतकी रम्यमनोहर जेंका ॥ तें सहवासी नित्य जयाचे पाहुनि सुख मानिं लोकां ॥ वाहवा बहार वसंताची ॥ ३ ॥ देहा-माजी व्यापुनि राहे मन्मथ त्या प्राण्याचे ॥ परिप्रिय मारुत संमत समयीं वाणुं भाग्य किति वाचे ॥ वाहवा बहार वसंताची ॥ रमणिय शोभा बहु त्याची ॥ वाहवा० ॥ ४ ॥ विरहि जनांच्या निज चित्तातें दग्धचि मन्मथ करितो ॥ वासंतिक हा समय मनोरम जाणुनि काव्याचि रचितो ॥ वाहवा बहार वसंताची ॥ रमणिय शोभा बहु त्याची ॥ ५ ॥

## पद

चाल—( नागपंचमी. )

बाहेर व्यापुनी जो जाहला ॥ मकरंद गंध बहु आगळा ॥ त्याचे विषयीं लोभी भला ॥ भ्रमर वासंतीं, जाणावा ॥ १ ॥ आम्रवृक्षाचें अंकुर ॥ त्यावरी बसले ते भ्रमर ॥ कंप-

विति क्रीडति वरचेवर ।। कोकिलपक्षी हो ते ठायीं ॥२॥ मधुर शब्दाचे भडिमार ॥ कोलाहल घोषें करूनी फार ॥ नानाविध काढिति खग उद्गार ।। मनोरम समयासी ।। वासंती ॥३॥ ते ध्वनि पडतां हो श्रवणांत ॥ विरही पुरुष संतापत ॥ व्याकुळ झाले दिवसरात ॥ त्या विश्रांत न मिळेचो ।। युवतीची ॥ ४ ॥

## ओंवी.

हो वसंत संबंधी दिन ॥ कष्टतर मार्गस्थ पुरुषांलागून ॥ तयाचें आणिक कारण ।। अग्रभागीं परिसावें ॥ १ ॥

वसंत ऋतूंचे ठायीं पांथिकजन स्त्रीविरहास्तव महद्दुःखानें कालक्रमणा करितात.

नंतर सखी गोपालकृष्णास दाखवून राधिकेशी संभाषण करिते.

## पद

चाल—( नंदगृहाच्या जवळि मुलींनो दिसतो रथ दुस० )

वृषभानूनंदिनीसि दुरुनी दाखवि सखि हरिला ॥ अंगुलिनें दाखवी सखि हरिला ॥ धृ० ॥ गोपवधूच्या आलिंगनासी ॥ सादर जो हरि पूर्ण विलासी ।। गोपीसंगति भोगि सुखासी ॥ चाल प०।। श्रमाचि परिहरिला ।। बघुनि हरी श्रम० ॥ १ ॥ मन्मथमोहन श्याम मनोहर ।। राजीव लोचन तो हरि सुंदर।। वाजवि वेणू मंजुळ सुखकर ॥ चाल प० ॥ गोपशिशु धरिला ॥ करामधे गोपशिशु धरिला ॥ २ ॥ ऐसा माधव राधेलागी ।। दाउनि बोले तूं या भोगी ॥ तत्पदकमलीं हो अनुरागी ।। चाल प० ॥ सांडुनि मानाला ॥ स्वयें तूं, सांडुनिमानाला ॥ ३ ॥

## पद.

चाल—( शारदे दासकामदे कमल मृदु पदे प्रजापति त० )

राधिके सौख्य साधिके आयके निकें हुखद मं

कथितें ॥ पहा माधव खेळत घेउनि व्रजयुवतींते ॥ ध्रु० ॥ यामिनीं. तरुण कामिनी, संगें घेउनी, करित जो लीला ॥ या वनांत मधुरिपु येउनि कैसा बसला ॥ स्त्रीसमाज सुखकर भला ॥ मग्न जाहला, त्यांसि लाभला सुदैवानें ॥ कैसा दिसतो सुंदर पहा सखे नयनानें ॥ चंदन करुनि चर्चिला भावें अर्चिला बहु परिमळिला सजल घनवाणी ॥ कटि पीत पितांबर कंठिं माळ सुखदानी ॥ श्रवणांत कुंडलें बरीं जडित परोपरीं झळकती द्वय कपोलीं शोभा ॥ घनःश्याम रमाधव हा मदनाचा गाभा ॥ मंदहास, पूर्ण उल्हास, नाहि कधि त्रास जया विषयाचा ॥ मृदु मंजुळ बोले पूर्ण हेतु करि त्याचा ॥ चाल धुमाळ ॥ गौरवार्थ पुष्टस्तनदानें करुन ॥ कोणि बल्लव युवती सप्रेमें येउन माधवासि देते बळेंचि आलिंगन ॥ चाल ॥ कोणि गाति नाचती सुखें, वदति कौतुकें मानुनी धन्य जगीं आपणातें ॥ भवपाशविमोचन घ्या श्रीहरिचरणातें ॥ १ ॥

## पद

चाल—( होईल कलह म्हणोनी ॥ दिधला यातें नेम० )

सुंदर मृगलोचनी बल्लव युवति सुदति पहा गे॥ ध्रु० ॥ भोग विलासा आणुनि सुमनीं ॥ पहती गोपी चंचल नयनीं ॥ कामविकारें हरिमुख निरखुनी ॥ चिंतन करिती मुदें ॥ बल्लव ॥ १ ॥ चिंतन करिती कोणि नितंबिनी ॥ श्रवणनिकट ही जडली भाषणीं ॥ लुब्ध अशी जी वारण॰ गमनी ॥ करुनि स्पर्श बळें तो अंगीं रोमोद्गम उठतो ॥ सुंदर मृग० ॥ २ ॥

## साकी.

कोणी सुंदर गोप वधूटी येउनि स्वांगें जाण ॥ भाषण

त्याजें चुंबन घेई श्रीहरीतें निरखून ॥ मानुनि हर्ष मर्द लक्ष श्रीहरिच्या चरणीं ॥ १ ॥

दिंडी.

तरीं यमुनेच्या लता कुंजगेहीं ॥ स्वयें गेला श्रीपती सुपाही ॥ कामचातुर्यें करी खेळ भारी ॥ धरुनि पीतांब ओढि पूतनारी ॥ २ ॥

अंजनीगीत.

बहु स्त्रियांच्या समुदायांत ॥ नर्तन रस शृंगार हि त्यांत ॥ मधुर मनोहर गातो गीत ॥ त्यांतें स्तावित हरी ॥ १

पद.

चाल—( वैशाख मास वासंतिक समय शोभला. )

सुंदरि हे रमणि युवति हरिणलोचने ॥ नृत्यगीत अभिनय तो बघुनि सद्गुणे ॥ धृ० ॥ तोष मना होत आजि चारुहासिनी । सुखकर तूं गमसि मला मधुरभाषिणी ॥ अधर सुधासुरसि लुब्ध जाहलों मनीं ॥ चाल ॥ तुजविण मज चैन नसे करित साधनें ॥ सुंदरि० ॥ १ ॥ रासरसीं नियमित तो ताल चांगला ॥ करवलयांकित घोष जाणिजे भला ॥ चाल ॥ स्तावतवेद वंशि धन्य धन्य तिस म्हणे ॥ सुंदरि० ॥ २ ॥ यापरि हरि स्तोत्य करि बघुनि गोपिका ॥ वक्रभ्रुकुटि मंदस्मित करुनि कौतुका ॥ गौर वर्ण सरळ तनु सौख्यदायका ॥ चाल ॥ हाव भाव करिति स्वयें उत्सवीं मनें ॥ सुंदरि० ॥ ३ ॥

पद.

चाल—( वीर शिरोमणि सकल धनुर्धर नायक तूं० )

आलिंगितो हरि व्रजयुवतींतें सप्रेमें बाहुनी ॥ चुंबितो अधरामृत सेवुनी ॥ धृ० ॥ कवण्या स्त्रीतें जाउनि स्वांगें

रमवितसे कीं दुरी ॥ कवणा बाहत यमुनातिरीं ॥ कवणा संगति हास्य विनोदा लागुनि करि सत्वरी ॥ संकेत दाउनि नानापरी ॥ जयदेवाचें गीतरूप वन, वृंदावन श्रम हरी ॥ त्यामधि क्रीडा करि मुरहरी ॥ १ ॥

असें झाल्यावर सखी राधेप्रत भाषण करिते.

## पद.

चाल—( रामचंद्र नाहिं घरीं काय मीं करूं ॥ )

वासंतिकसमयीं हरि खेळतो पहा ॥ वृंदावनिं युवति सहित शोभतो महा ॥ धृ० ॥ हे सखि अनुरागें करुनि सकल नारिसी ॥ तोष देउनि रंजवि बहु मदन विलासी ॥ नीलोत्पलमालेपरि कृष्ण वर्णसी ॥ चाल ॥ करचरणादीक मृदुल अवयवें अहा ॥ वासंति० ॥ १ ॥ कोमल अति करपदादि अंगें शोभलीं ॥ तिहीं करून स्पर्शमात्रें रम्य भासली ॥ सुखद वेळ, काम मदा उपजवी भली ॥ चाल प० ॥ गोपवधू विरह दुःख शमविती दहा ॥ वासंतिक० ॥ २ ॥ परिरंभण करिति सुखें भाव दाउनी ॥ अभिनयतो कटाक्षयुक नेत्र मारूनी ॥ पंचबाण स्वरूप हृदयीं सकल भाउनी ॥ चाल ॥ मूर्तिमंत सुखविलास गमत श्याम हा ॥ वासंतिक० ॥ ३ ॥

## पद.

चाल—( रुचतो कां तीर्थयात्रा या समयीं त्यास ती. )

सुखसरिते राधिके गे या माधवि चांगला ॥ मलयाद्रीवरुनि आला वायू हा व्यापला ॥ धृ० ॥ निज कोढरिं फणिपतीच्या दंशानें उष्ण तो ॥ क्लेशास्पद वायु वहे खडतर बहु लागतो ॥ सीतत्व प्राप्त व्हाया सागरिं जो वाहतो ॥ चाल० ॥ सीतळ बहु मंद मंद सुखदायक हो

मला ॥ सुखसरितं० ॥ १ ॥ तुज सम या विरहिणीला क्लेशाचा भासला ॥ विषयोगें उष्ण सारा या समयीं भासला ॥ दाह शांत व्हायासाठीं परताया लागला ॥चाल १० ॥ उत्प्रेक्षा केली ऐसी अन्यार्थ राहिला ॥ सुख० ॥२॥ वासंती कोकिलांचे स्वर मंजुळ लागती ॥ आम्राच्या मंजिरीतें पाहुनियां बोलती ॥ कुहुकुहु शब्दां करुनी स्वच्छंदें डोलती ॥ चाल १० ॥ सर्गोतीं मंगल कवि करितो आशीला ॥ सुखसरितं० ॥ ३ ॥

## पद.

चाल—( केलीस अशी काय परीक्षा तूं सखेग. )

शृंगार मनोरम विलासमग्न गोपिका ॥ त्यासमीप रास कलिश्रवणें राधिका ॥ ध्रु० ॥ प्रेमानें अंध बहु होउनि वदतसे ॥ साधु तव वदन चंद्र अमृत द्रवतसे ॥ गीत-स्तौत्य त्याजें स्पष्ट आजि तें असे ॥ चाल ॥ कामहृदयीं कारण हें चुंबिलें टका ॥ शृंगार मनोरम० ॥ १ ॥ चुंबन-चातुर्य बघुनि चतुर शौरि तो ॥ वृषभानू नंदिनिच्या स्वरुपिं भूलतो ॥ मंदहास करुनि तितें नित्य निरखितो ॥ ऐसा हरि रक्षो सदा अखिल भाविकां ॥ शृंगार० ॥ २ ॥

याप्रमाणें श्रीजयदेव कवि यानें सामोद दामोदर नामक प्रथमसर्गांत श्रीकृष्णलीला वर्णन केली आहे.

श्रीगोपाल कृष्णार्पणमस्तु

श्रीगोपालकृष्णःप्रसन्नोस्तु.

# गीतगोविंदसर्ग २



यानंतर सकल वृत्त स्मरविन हांस्याना कवि भाषण करितो.

## पद.

चाल—(सफलेच्छा तों करुनि सुरांची ॥ आलि सत्करिं तनु कैकईची ॥ चढली कमान या कलिची ॥ आतां व० )

प्रेम धरुनि मनिं माधव रमतो ॥ वृंदावनिं व्रजवधु रिझवितो ॥ नानापरि रतिकेली करितो ॥ काय म्हणों आतां ॥ १ ॥ इतर गोपिहुनि सौंदर्याची ॥ खाणि राधिका निजसौख्याची ॥ पाहे ममता धरुनि रुपाची ॥ कृष्ण-म्हणुनि रुसली ॥ २ ॥ भ्रमर बहुत गुंजारव करिती ॥ तेणें विपिना शोभा चढती ॥ लताकुंजगृहिं जाउनि लपती ॥ झाली राधिका ॥ ३ ॥ विरहें करुनी बोले राधिका ॥ कां त्याजिलें मज जगत्पालका ॥ वदलो सखिप्रति दाखवि लाटेका ॥ चोरजार कोठें ॥ ४ ॥

## साकी.

या वृंदावनिं रासमंडळीं विलास माधव करितो ॥ मंद स्मित मुख गल्ल प्रफुल्लित वल्लव युवती धरितो ॥ हे सखि पुरुषोत्तम स्मरतें ॥ होइल दर्शन मज काधनें ॥ १ ॥

## दिंडी.

रासक्रीडेचे ठाइं कसा शोभे ॥ नंदनंदन स्मरमूर्ति बघुनि लोभे ॥ चित्त माझें निशिदिनीं सखे बाई ॥ सख्याहरि वांचुनि मजासि सौख्य नाहीं ॥ २ ॥

## अंजनीगीत.

सखये स्फुरतो अमृत समान ॥ अधर मधुर ध्वनि करितां गान ॥ नानापरिची घेउनि तान ॥ वाजवि वंशीतें ॥ १ ॥ चंचल दृष्टी डोलवि माथा ॥ कर्णाभरणें हालती गातां ॥ अद्भुत शोभा गलीं पडतां ॥ मात्र विलक्षणते ॥ २ ॥ मयूरपिच्छें नयनाकार ॥ विचित्र मुकुटीं वेष्टित फार ॥ रुळती सुंदर केश हि प्रचुर ॥ विस्तृत स्कंधि पहा ॥ ३ ॥ इंद्रधनुष्यापरि असमंतीं ॥ वेषमनोहर शोभा दिसती ॥ मन्मथमूर्ति बघुनी युवती ॥ लागति सहज पदीं ॥ ४ ॥

## पद.

चाल—( लहान वस्तु स्थुल दिसली. )

शृंगारवल्लरि व्रजयुवती ॥ केवळ रतिच्या आलि गमती ॥ श्रीमुखचुंबाया झटती ॥ चाल ॥ अरुणप्रभेसम निजाधरानें ॥ प्रकट ध्वनि भारा ॥ खेळे स्वेच्छें मुरहारी ॥ गोपिकास्पर्शुनि सौख्यानें ॥ बहुत तैं श्रमित घर्मानें ॥ १ ॥ बाहूपल्लव सन्मानें ॥ चाल ॥ वलितरुसिजासिवेणुनि घेतः आलिंगिति नारी ॥ २ ॥

## श्लोक—( कामदा. )

सहस्र गोपिका संघ चांगला ॥ रास मंडळी फार शोभला ॥ रत्नयुक्त तीं नूपुरादिकें ॥ शीघ्र त्या तया लागि सारिकें ॥ १ ॥

## साक्या.

मेघमंडळीं चंद्र शोभतो ज्योत्स्ना बरवी पडली ॥ त्याहुनि सुंदर तिलकचंदनी कुचप्रदेशीं घडली ॥ शोभा मर्दन समयांत व्रजवधु तरुणिविलासांत ॥ १ ॥ रत्नज-

डितबहुमणिमयभूषणकांचनयुक्ताशोभे ।। मकराकृति तीं श्रवणिं कुंडलें पाहुनि मन्मन लोभे ।। विकसित गंडस्थळ ज्याचें ॥ ऐसें स्वरूप माधवाचें ।। २ ॥

दिंडी.

हर्षदायक पटपीत धरीश्याम ।। मुनीमानवसुर घेति सुखीं नाम ।। नंदनंदन यापरी वनामाजी ॥ खेळताहे व्रजयुवति जयाराजी ।। ३ ।।

घनाक्षरी.

कदंबाचे तळीं जाण ।। कलिमलहर भाग्यवान ।। स्फुरे दृष्टिमात्रें मदन ।। रमवि गोपिका सदा ।। १ ॥

पद.

चाल—( माझा भरत देखिला काय. )

सखये काय करूं आतां ।। नसुचे मज कांहीं ।। ध्रु० ।। श्यामसुंदर मनोहर ।। कंठीं वैजयंती हार ।। किरिट कुंडलें मकराकार ।। विश्वाधार तोचि स्वयें ।। सखये० ।। १ ।। साजणि झालें त्याविण दीन ।। जैसा जिवना वांचुनि मीन ।। त्याविण झालें या जगिं हीन ।। दिसतें मलीन काय करूं सखये० ।। २ ।।

पद. ( राग सारंग )

चाल—( धन्य उषा हीं बाण कन्यका अतिलावण्या० )

हे सखये मन माझें घेतें ओढ बहू श्रीहरिकडे ।। इकडे तिकडे चहूंकडे मी भ्रमतें हृदयीं सुख न घडे ।।ध्रु०।। मजवांचुनि विभु दुसऱ्या युवती घेउनि रमतो एकांति ।। नानापरिची क्रीडा करितो ॥ पाहुं कशा मी त्या सवती ।। सखये० ।। १ ।। ऐसा चंचल अभिलाषी यदुवंशोद्भव मम प्राणसखा ।। त्याविषयीं मन लालुचलें आतें टाकुनि

दिधला मान फुका ॥ हे सखये० ॥ २ ॥ त्यागुनि दोषा सोडुनि रोषा सद्गुणग्रहणीं तोषाला ॥ धारण करितें चिंतन करितें काय करूं या चित्ताला ॥ हे सखये० ॥३॥

## पद.

चाल—( व्यर्थ आम्ही अबला, खचितबाई० )

सखे मी काय करूं याला ॥ विन्मुखगोपाला ॥ धृ० ॥ केशिमथन हरि मन्मथमूर्ती ॥ साहूं किति विरहाला ॥१॥ रमविलें मज एकांतीं बहु ॥ हाचि खेद मनाला ॥ सखे मी० ॥ २ ॥ रति उत्सुक तो. मंदस्मितमुख ॥ कुंजगृहीं लपला ॥ सखे० ॥ ३ ॥ चहुंकडे मी शोधचि करितें ॥ नाहि कुठें दिसला ॥ सखे मी० ॥ ४ ॥ सभय मनामधिं विस्मित होउनि ॥ बघतें मधुसुदनाला ॥ सखे मी० ॥५॥

## पद.

चाल—( पाहिन केव्हां सिंहासनिं माझा राजाराम कधिं. )

प्रथमसमागमीं लाज्जित झाली ती लज्जा दुर व्हायासी ॥ मधुर मधुर मृदु मंजुळ बोले सातिहास तो सुखराशी ॥ धृ० ॥ तो नंदात्मज माझ्या कटिवरि भरजरि वसना शिथिल करी ॥ कोमल पल्लावें रचुनी शय्या शयन करवी मजसि हरी ॥ प्रथम० ॥ २ ॥ तो जगदात्मा अखंडित मम हृदयावरिगे करि शयन ॥ करि आलिंगन चुंबन देउनि, अधरामृत करि पानधन ॥ प्रथम० ॥ ३ ॥ सुरतपरि श्रम होउनि भारी नेत्राच्छादन मी केलें ॥ सुंदर रुचिरकपोलहि ज्याचे रोमोद्गम सह सुखभेले ॥ प्रथम० ॥ ४ ॥ ऐसा माधव मदनशरानें व्यापित चंचल याच परि ॥ कोकिलसम मी मंजुळभाषिणी कामरसिक तो दनुजारी ॥ प्रथम० ५ ॥

## अंजनीगीत.

अस्ताव्यस्त मी आहे फार ॥ कुसुमयुक्त ममकबरी ॥ भार ॥ ऐसे असतां बहु सुकुमार ॥ चमत्कृती करितो ॥ १ ॥ नखप्रहारें करुनी जाण ॥ विनोद करि बहु श्रीभगवान् ॥ विदारिला स्तनभार जयानें॥ ऐसा श्रीपति तो ॥ २ रत्न जडित नुपुरें चरणीं ॥ माझीं ऐसीं करिती ध्वनी ॥ पूर्ण विलासी केश धरूनी ॥ चुंबन घे माझें ॥ ३ ॥ रती समयीं जो प्रेमरसानें ॥ मंदवर्ततो अति अदरानें ॥ जो सानंदें करोनी मानें ॥ रमवी बहु मजला ॥

## घनाक्षरी.

तो कृष्ण सखेपाही ॥ कामोद्गमज्याचे ठायीं ॥ केशिमथन फणिशायी ॥ यापरिच्च जाणगे ॥ १ ॥ ऐसें भावी मनींसाच ॥ मनीं आणि स्मरजाच ॥ चिंतन करुनि हरि असाच ॥ बोलें वचन सखीला ॥ २ ॥ वांछितसे दर्शनासी ॥ राधा तुझ्या संगमासी ॥ कवि वर्णी चरित्रासी जना श्रुत व्हावया ॥ ३ ॥

## पद.

चाल -( नको हरी तूं बाहिर जाऊं गवळणी तुज ध० )

त्यागुनि मजला यदुपति गेला अन्य कामिनी सहित वनीं ॥ तद्विरहानें दुःखित झालें साह्य नसे मज कुणे अवनीं ॥ धृ० ॥ उदका वाचुनि मत्स्य तरमळे तेवि अवस्था ही माझी ॥ हे सखि व्याकुळ झालें अखंडित अद्भुत कीर्ति महिमाजी ॥ त्यागुनि० ॥ १ ॥ निरखाया ःज अशक्य ऐसे सूक्ष्मपुच्छ बहु गुच्छ जिचे ॥ ऐसी ःलावि नूतन शाखा अशोकमय बहु भाग्य तिचें ॥ त्यागुनि० ॥ २ ॥ तत्कुसुमोद्भव आणिक उपवन संबंधाचा

समीरण ॥ तोहि सखे मज दुःखचि देतो आम्रमंजरी सौख्यधन ॥ त्यागुनि० ॥ ३ ॥ वृत्त शिखरिणी सखी शिखरिणी ऐसा भावाचि दाखविला ॥ सर्गातीं कवि मंगल वर्णी तोचि कथितसे भाग भला ॥ त्यागुनि० ॥ ४ ॥

## घनाक्षरी.

साभिप्राय मंदहास ॥ ज्याचे ठायीं सावकाश ॥ अस्ताव्यस्त केशपाश ॥ गळतो ज्या समाजिंहो ॥ १ ॥ वक्र भ्रुकुटि ज्याचे ठायीं ॥ कंडुयनादि सकल पाही ॥ छल वशें करून तेही ॥ भूजा मूळ आणखी ॥ २ ॥ वितस्तिपरिमित स्तनभार ॥ ज्याचे ठाई सकुमार ॥ गोपिकांसि मनोहर ॥ क्रीडमाजि रंजवी ॥ ३ ॥ ऐसे रहस्य बघुनि जाण ॥ आपुलो प्रियकर सुखखाण ॥ स्मर त्यागुनि अ मान ॥ दे सन्मान निजला ॥ ४ ॥

## साकी.

बल्लव युवती परम सुखद तो राधा आणुनि हृदयीं ॥ चिंतन करि हरि तो संरक्षो अखिलातें या समयीं ॥ श्रीजयदेव कवी बोले ॥ चिंतुनि हरिपद बहु डोले ॥ १ ॥

याप्रमाणें श्रीजयदेव कवी यानें अक्लेशकेशव नामकद्वितीय सर्गांत श्रीकृष्णलीला वर्णन केली आहे.

श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंदसर्ग ३



श्रीजयदेव कवी याप्रकारें करून श्रीकृष्णाच्या पश्चात्तापातें वर्णन करितात.

## श्लोक. ( शुद्धकामदा. )

इतर गोपिका त्यागुनी हरी ॥ विरहसागरा अंतरीं धरी ॥ मदनमंजिरी राधिका पहा ॥ स्मरुनि कौतुकें बोलिला अहा ॥ १ ॥

## साकी.

या जगतामधिं संसाराची पूर्ण शृंखला साची ॥ वृषभानू नंदिनी राधिका कलिका सौंदर्याची ॥ तीतें स्थापुनि हृदयांत ॥ करितो चिंतन जगतांत ॥ १ ॥

## दिंडी.

अन्यगोपी त्यागूनि हरि वनांत ॥ खिन्न होउनि बैसला निजमनांत ॥ खंजनाक्षी कुतकी वर्ण गात्री ॥ कुठें पाहूं मी राधिका सौख्यदात्री ॥ १ ॥

## पद.

चाल—( मज बहुतचि ही आशा होती वहिनी ॥ मत्पतिचा शोध करूनी. )

पश्चात्तापानें बोले तो दनुजारी ॥ विरहातुर मनिं होऊनी ॥ ध्रु० ॥ इतर व्रजवंधुनीं वेढियलें कीं मजला ॥ मी अलभ्य गमलों तिजला ॥ असें पाहुनियां रुष्ट होउनी गेली ॥ मज त्यागुनीयां सुखवल्ली ॥ नको जाऊं हें वदलों नच त्या वेळीं ॥ जाणुनीच सखि रागेली ॥ मजवरि

निष्ठुरता आज कशी तिनें केली ॥ नाहीं रतिसंगर या॰ काळीं ॥ चाल ॥ आतां पाहुं कुठें मी तिजला ॥ मदनें जिव व्याकुळ झाला ॥ नाहिं विरहानळ तो शमला ॥ चाल ॥ आतां काय करूं ॥ सौख्य नसे संसारीं । राधेवीण मजलागोनि ॥ १ ॥

साकी.

हाहा देवा मजपासुनियां काय अनादर झाला ॥ यास्तव तिजला कोप येउनी त्यागचि माझा केला ॥ आतां काय करावें गा ॥ कैसा साहूं स्मरवेगा ॥ १ ॥

दिंडी.

सखीवांचुनि वांचूनि या जगांत ॥ कसा कंठूं मी दिवस आणि रात ॥ काय मजला तें द्रव्य स्वजन आप्त ॥ तसें मंदिर हें जाहलें हृदय तप्त ॥ १ ॥

ठुंबरी

चाल — ( मोहनरसिया आये बगियामें फूल॰ )

जीवित हें मज व्यर्थ गमतसे राधेवाचुनि सकल जगांत ॥धृ०॥ कोपातिशयें वक्र जाहली भ्रूवली हे ज्या भामिनिची जीवित हें॰ ॥ १ ॥ यास्तव तिजला चिंतितसे मी, तें मुख सुखकर किति तरि वाणूं ॥ जीवित॰ ॥ २ ॥ मुख-कमलावरि कुंतल शोभति भ्रमरीं व्याकुळ रक्तकमल जे ॥ जीवित॰ ॥ ३ ॥

अंजनीगीत.

ध्यानावस्थेमाजीं जाण ॥ असतां हृदयीं सौख्यनिधान ॥ ती राधा मज करि रममाण ॥ अखंडित मोदें ॥ १ ॥
मानसमोहन राधाराणी ॥ भरली माझ्या दोन्ही नयनीं ॥ कां जावें मी विकट गहनीं ॥ शोधाया करितां ॥ २ ॥

ऐसें असतां केवि अडावें ॥ शोकें भूमीवरति पडावें ॥
राधाचिंतन करुनि रडावें ॥ व्यर्थ कशा करितां ॥ ३ ॥
हृद्यामाजी वसत राधिका ॥ तीतें बोले करुनि कौतुका ॥
श्रीहरि प्रेमें रुष्ट अशी कां ॥ होशी मजवरती ॥ ४ ॥

## पद. ( राग बिलावल )

चाल—( प्रतीकुल होइल कैसा कृष्ण देव मातें० )

हृदयस्थ राधाराणी निरखूनि डोले ॥ यदुपति प्रियसखिला आठऊनि बोले ॥ ध्रु० ॥ सुंदरि व्यापिलें तव हें हृदय मत्सरानीं ॥ ऐसा मी करितो तर्क खिन्न होवोनी ॥ कोठें गेलिस सांग तु मजला, लपलीस रांनीं ॥ चाल ॥ प्राणप्रियकरणी तुजला व्यर्थ अवमानिलें ॥ हृदयस्थ० ॥ १ ॥ सहजासहजीं गेलिस तूं गे निघूनी त्वरीत ॥ नाहीं प्रार्थियेलें म्हणुनी होसि गे कुपीत ॥ पूर्ववत पाहसी मजला तूंचि दिवसरात ॥ चाल ॥ येसी, जासी, फिरसी राधे काय असें केलें ॥ हृदयस्थ० ॥ २ ॥ राधे न देशी तूं मजला दृढालिंगनातें ॥ म्हणउनी वाटे माझ्या दुःख हें मनातें ॥ क्षमा करी मजवरि राधे, ठेवी प्रीय नातें ॥ चाल ॥ अपराध न करी ऐसा कथितो ये वेळे ॥ हृदयस्थ० ॥ ३ ॥ विरहानळानें माझें हृदय भाजियेलें ॥ पंचबाणें मजलागी बहु गांजियेलें ॥ माधवाचें भाषण ऐसें सर्व वाणियेलें ॥ चाल० ॥ तिंदुबिल्ववंशोद्भव कवि जयदेव बोले ॥ हृदयस्थ० ॥ ४ ॥

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें )

त्रिजगविजयहेतुभूत देविराधिका ॥ मन्मथाचि जंगम ही विषयसाधिका ॥ ध्रु० ॥ जयेमाजि आयुधें सर्व मदनें

ठेविलीं ॥ कुसुमयुक्त पल्लवभ्रू शक्ति योजिली ॥ चाप, दृक्कटाक्षयुक्त प्रखर भासली ॥ चाल ॥ धनुष्याचा श्रवण कोण साच हा निका ॥ त्रि० ॥

यानंतर राधेच्या वियोगें करून श्रीकृष्णास संताप प्राप्त झाला, तत्परिहारार्थ शीतळ चंदनादिक पदार्थ धारण केले. तें पाहून मी रुद्रच आहे असें समजून मला मदन अधिकच पीडा करितो कीं काय, अशी कल्पना करून मदनास उद्देशून कृष्ण बोलतो. त्याचें कवि वर्णन करितातः—

## साकी.

श्रीहरि बोले हे मदना तूं शंकर भाविसि मजला ॥
राधा विरहित या जगिं आहे हा जन कीं बहु श्रमला ॥
मारुं नको मज बाण ॥ होतो कासाविस हा प्राण ॥ १ ॥

## इंद्रसभा.

चाल—( सुनेरेमेरेदवेरे ॥ इंदर मेरा नाम ॥ बिन्‌परोंके दीं दसे ॥ नहि मिले अराम ॥ )

मजवरि तूं धांवसि कां ॥ कुसुमयुक्त बाण ॥ चाप सज्ज करुनि कसा ॥ घेसी मम प्राण ॥ १ ॥ नीलकंठ नोहे मी ॥ हेंचि मनीं आण ॥ चाप सज्ज करुनि कसा ॥ घेसी मम प्राण ॥ २ ॥ मृणालहार कंठीं न च ॥ वासुकि विषखाण ॥ चाप सज्ज करुनि कसा ॥ घेसी मम प्राण ॥ ३ ॥ नीलोत्पल माल कंठिं ॥ हें न गरल जाण ॥ नीलवर्ण शंकुनियां ॥ घेसी मम प्राण ॥ ४ ॥ श्वेत चंदनीय लेप ॥ चर्चिला महान् ॥ हेंचि भस्म जाणुनियां ॥ घेसी मम प्राण ॥ ५ ॥

यानंतर राधेच्या विरहेंकरून अधिकच पीडा झाली. तत्परिहारार्थ श्रीकृष्ण मदनातें प्रार्थितो.

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें. )

मारुं नको पुष्पबाण मन्मथा मला ॥ लीलेनें सहज विश्व जिंकिशी भला ।। ध्रु० ॥ मुर्छितासि व्यर्थ कसा ताडितोसि रे ।। विक्रम यामाजि नसे तूंचि पाहिरे ॥ विरहें मी व्याप्त बहू अंतरीं झुरे ॥ चाल ॥ "राधिका" सुमंत्र मुखीं जपत चांगला ॥ मारुं० ॥ १ ॥ मृगनयनी राधिका सुरूप सुंदरी ॥ नेत्रबाण मारुनि मज विंधिलें तरी ॥ मदनाग्नियोगें बहुत दग्ध अंतरीं ॥ चाल० ॥ सुप्रसन्न नाहीं चित्त विरह मातला ।। मारुं० ॥ २ ॥

हृदयस्थ राधेस उद्देशून भगवान बोलतात.

## पद.

चाल—( केलीस अशी काय परीक्षा तूं सखेगे )

राधे तव बिंबाधर रक्त या परी ॥ बिंबफलासम मनोज्ञ भासला तरी ।। ध्रु० ।। मजविषयीं सकल मोह सांग तो रचो ॥ यत्न करुनि धैर्यसेतु मदिय हा खचो ॥ शृंगारवल्ली तुज सम मज रत्न हें पचो ।। चाल ॥ स्त्रैण पुरुष पावताति मोह झडकरी ॥ राधे तव बिंबाधर० ॥१॥ सखये तव वर्तुळ कुचगोलकां सरी ॥ कनककलश गमत मला, नाहीं दूसरी ।। स्मरण मला मरणमूळ होय, सांवरी ॥ चाल ॥ त्वद्विरहें दुःख होय काय करुं तरी ॥ राधे० ॥२॥ सज्जन कुलवंत शीलवंत ते कदा ॥ करिति काय घात कुपित जाहले यदा ॥ राधे तव मूर्ति स्मरुनि तुष्ट मी सदा ॥ चाल ॥ नेत्रकटाक्षानें व्यथित झालों सुंदरी ॥ राधे० ॥ ३ ॥ अंगसंग करुनि पूर्वीं विषयसौख्य तें ॥ अनुभवीत होतों तेंचि विषय सौख्यतें ॥ राधे तव ध्यान

करुनि प्राप्त मजसि तें ॥ चाल ॥ आहे, परि विरह-दुःख होत अंतरीं ॥ राधे० ॥ ४ ॥

## अंजनीगीत.

जी कां मूर्ति निकट बैसली ॥ उभय करांनीं कवटाळीली ॥ प्रेमें होती मीं अनुभविली ॥ ती या समयीं पहा ॥ १ ॥ ध्यानावस्थेमाजी जाण ॥ स्पर्शसुखें मज लाधति पूर्ण ॥ ललितचंचलप्रेमनिरीक्षण ॥ विलास आठवती ॥२॥ सुधेसारिखें मधुर भाषण ॥ सर्वांचि तेथें वक्रपण ॥ शब्द-विषय तो केला वर्णन ॥ यथासांग सप्रेमें ॥ ३ ॥

पद ( राग झिंझोटी, ताल तिताला )

चाल—( नको तुझा संग आतां कोठें तरी जाऊं )

राधारूपिं लाउनी समाधि चांगला ॥ ध्रु० ॥ एकाग्रता होते फार ॥ भासे मला चमत्कार ॥ ब्रह्मानंदिं सौख्यसार ॥ योग साधिला ॥ राधा० ॥ १ ॥ ऐसा असतांहि भोग ॥ होता मज विरह योग ॥ वाटे तो केवळ रोग ॥ वियोग ना भला ॥ राधा० ॥ २ ॥ समाधिस्थालागि साच ॥ घडुं नये कदापि जाच ॥ परंपराविधि असाच शास्त्रिं वाणिला ॥ राधा० ॥ ३ ॥ सगातीं पंडित वर ॥ देइ आशिर्वादप्रचुर ॥ श्रोतयांसि मंगलकर ॥ चित्ति तोषल ॥ राधा० ॥ ४ ॥

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें. )

श्रीहरि करि मुरलीरव वक्रकंठ तो ॥ मस्तकिं गुंजावतंस बहुत डोलतो ॥ ध्रु० ॥ ऐसा मधुसूदन विभु लक्ष्य फारसा ॥ लावी जो राधामुखिं, इंदुवरि तसा ॥ प्रेमयुक्त ते अपांग, लुब्धला कसा ॥ चाल ॥ देउ तो तुझां अखंड

**सौख्यराशि तो ॥ श्रीहरि० ॥ १ ॥ सर्व स्त्रिया बघति वेणु परि ति राधिका ॥ मारितसे नयनविशिख गोपना-यका ॥ धन्य गोपयुवति त्यांत धन्य राधिका ॥ ॥ चाल ॥ वेणुरवीं होति लुब्ध, हाचि आशय, तो ॥ ॥ श्रीहरि० ॥ २ ॥**

याप्रमाणें गीतगोविंद ग्रंथांत मुग्धमधुसूदन नामक तृतीयसर्गांत कृष्णलीला वर्णन केली आहे.

श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु .

# गीतगोविंदसर्ग ४



यानंतर राधिकेची सखी श्रीकृष्णासंनिध येऊन संभाषण करि त्याचें वर्णन कवि करितो.

## पद.

चाल—( कांहीं बोला महाराज ।। चतुर सुगर ० )

आली आली ती स्वयें ।। राधेचा संदेश घेउनी श्री हरिप्रति ये ।। ध्रु० ।। कालिंदीतटिं निकुंजसदनीं बै श्याम मुरारी ।। राधेकरितां अतिशय प्रेमें व्याकुळ दनु जारी ।। आली आली ती स्वयें ।। १ ।। संनिध येउ हरिच्या वदली उत्कंठित मृदु वाणी ।। दीनदया० कृपा करी तूं, विरही तव राणी ।। आली आली० ।। २ मन्मथबाणभयानें त्रासुनि अनुसरली तवपायीं ।। ध्या करुनि तवस्वरुपिं गुंतली जनिं वनिं तुज पाही ।। आ ।। ३ ।। तुजवांचुनि ती न जाय कोठें भाव असा हा दावी त्या प्रियसखिची विरहदशा ही कथितें परिसावी ।। आ० आली ती स्वयें ।। राधेचा संदेश घेउनी० ।। ४ ।।

## साकी.

दाह तनूचा शांत व्हावया चंदन अंगीं पहिलें ।। लावि यलें परि निंदी सखि त्या, तें न सुखप्रद झालें ।। विरह ग्नीनें बहु छळिलें ।। बोले काय करूं वहिलें ।। १ ।।

## दिंडी.

म्हणे राधा हें जळो चंदनाचें ।। नको उटणें मजला तीक्ष्ण साचें ।। तनूमाजी लागला अग्नि सारा ।। आ० वाहुनिया त्वरें वेदसारा ।। १ ।। तापशमना चंद्रिकेमा

नेली॥ आम्ही तिजला परि चित्ति न ती घाली ॥ सीत नोहे परि जाच हो तियेस ॥ तुझ्या विरहें तिस दुःख आणि क्लेश ॥ २ ॥

## पद.

चाल—( ऐकुनि विपरित वाणी ॥ द्रौपदि दचकली मनीं० ॥ कर्नाटकी )

शय्या कुसुम चतुरता ॥ केली व्हाया स्थीरता ॥ ध्रु०॥ दक्ष लक्ष लाउनी ॥ रचिली शय्या जाउनी ॥ सुगंध कुसुमें आणुनी ॥ वरी तीस बसवुनी ॥ चाल ॥ लोहशर-वत व्यर्थ ते गमत, नाहि शांतता ॥ आम्हि श्रमलों बोलतां॥ शय्या० ॥ १ ॥ तुझ्या विरहें करून ॥ माधवा दुःख म्हणून ॥ कुठवरि करूं सहन ॥ नाहीं होत दमन ॥चाल॥ प्राण कासाविस होतो बहुवस॥ नको होऊं चालता ॥ शय्या० ॥ २ ॥ आलिंगनार्थ राधिका ॥ टपालि बहुत गोपिका ॥ मन्मथव्रताचि कौतुका ॥ करिते काय भाविका॥ चाल ॥ शरपंजराचें, व्रत करि साचें, होइ बोलता ॥ केली व्हाया स्थीरता ॥ शय्या० ॥ ३ ॥ राधा वदनावरती ॥ तवविरहें पडती ॥ नेत्रांतूनि खालती ॥ जळबिंदु वाहती ॥ चाल ॥ राहु ग्रासी शशि ॥ सुधा गळे तसी ॥ तीच अवस्था ॥ शय्या० ॥ ४ ॥

## पद. राग, सारंग.

चाल—( गौरवर्ण मृदु अंग सुंदरी० )

हे माधव तवविरहें करुनि व्याकुळ राधा बहु झाली॥ उदकावांचुनि मीन तळमळे तैसी हृदयीं करि काहाली ॥ ध्रु० ॥ एकांतीं तुज मन्मथरूपा भाउनि पूजित लवलाहें ॥ मकरवाहना चिंतुनि करिते उपासना दृढ तव पाहे ॥ हे माधव० ॥ १ ॥ मृगमदानें लेखन करुनी त्वन्मूर्तीचें करि

ध्यान ॥ पंचप्राण ते अर्पुनि चरणीं करिते चरितामृतपान ॥ हे माधव० ॥ २ ॥ रोहिणिवर ही जाळी मजला चैन पडेना काय करू ॥ तुजवांचुनि हरि लताकुंजगृहिं सांग कुठवरि धीर धरूं ॥ हे माधव० ॥ ३ ॥

पद. ( उत्तररागिणी )

चाल—( रामचंद्र नाहिं घरीं काय मी करूं० )

माधवजी त्वदिय ध्यानयोग साधिला ॥ हृदयीं परि विरहभोग बहुत बाधिला ॥ ध्रु० ॥ एकाग्रें कल्पुनि तुज पुढांत श्रीहरी ॥ करि विलाप. उपेक्षिसि आणुनि अंतरीं ॥ स्मरुनि सर्व रुदन करी घोर हा धरी ॥ चाल ॥ मृषा-वचनें समाधान हास करि भला ॥ माधवजी० ॥ १ ॥ अपराधा स्मरुनि करी खेद मानसीं ॥ पश्चात्तापें रुदन करी विरहि फारसी ॥ आलि शरण चरणकमलीं भ्रमरि या जसी ॥ चाल ॥ विरहताप वारि असा, देह भागला ॥ माधव० ॥ २ ॥ जयदेवें वाणियलें चरित हें बरें ॥ हरि-विरहें व्यथित मनीं राधिका झुरे ॥ सहचरिचें वाक्य श्रवणपठण सादरें ॥ चाल ॥ सद्भावें करिति त्यांसि मोक्ष लाभला ॥ ३ ॥ माधवजी० ॥

गोपालकृष्णास दूतिका आणखी भाषण करित.

साकी.

तव विरहानें तप्त राधिका काननिं जैसी हरिणी ॥ सांपडली दावाग्नीमाजी तळ्ठत जाहली तरुणी ॥ करि जी कासाविस प्राण ॥ वाहते चरणांची आण ॥ १ ॥ सदनीं असतां दैन्य पावली भावी मी कांतारीं ॥ नसलें जाउनि, सखिजन नलगे भासचि होता भारी ॥ आतां काय करावें गा ॥ कैसी साहिल स्मरवेगा ॥ २ ॥

यानंतर सखी राधेचे क्लेश वर्णन करिते.

## अष्टपदी. ( देशांकरागें एकतालें )

( स्तनविनिहितमपिहारमुदारं ॥ सा मनुते कृशतनुरतिभारं )
राधिका विरहें तव केशव ॥ पीनपयोधरि मुक्तमण्यांचा ॥ हारहि भारचि मानी साचा ॥ राधिका विरहें तव केशव ॥ ध्रु० ॥ मलयपंकजा लेपन करितां ॥ विषसम मानी मन्मथसरिता ॥ राधिका विरहें तव केशव ॥ १ ॥ श्वासवायुतें सोडी सुंदरि ॥ मदनाग्नीची जशी लहरी ॥ राधिका विरहें तव केशव ॥ २ ॥ दाहि दिशांचे ठायीं देवा ॥ पाहुनि रडते. करि हिच सेवा ॥ राधिका विरहें तव केशव ॥ ३ ॥ नालरहित कमलापरि लोचन ॥ झाले शोकें न करी मोचन ॥ राधिका विरहें तव केशव ॥४॥ कोमल पल्लवमय तल्पाचा ॥ भोग न घेई दिन दुःखाचा ॥ राधिका विरहें० ॥ ५ ॥ काढीना कर गालावरचा ॥ चिंताकुल बहु बोले वाचा ॥ राधिका विरहें तव केशव ॥ ६ ॥ हरि हरि हरि हरि वदत मुखानें ॥ मरणोन्मुख जी तव विरहानें ॥ राधिका० ॥ ७ ॥ श्रीजयदेवें हरिपदि गीत ॥ अर्पण केलें हें संगीत ॥ राधिका विरहें तव केशव ॥ ८ ॥

यानंतर विरहसंबंधीं अनेक अवस्थांनें बोलत असतां दूतिका प्रार्थना करिते.

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें )

अश्विनेयतुल्य होसि वैद्य केशवा ॥ कामज्वरें तप्त बहुतें जाहली राधिका ॥ ध्रु ० ॥ जाती कुसुमासमान वृषभानु नंदिनी ॥ लावण्याची लतिकाच सौख्यदायिनी ॥ दुःखित बहु झालि पहा हरिणलोचनी ॥ चाल ॥ अधरामृतपानीं करवि निजलि येधावां ॥ अश्विने० ॥ १ ॥ शृंगाररूप

वेली देऊनि शीघ्र वांचवी ॥ समागमें हास्यगीत करुनि नाचवी ॥ दर्शन तिस देऊनि हृदयीं रूप सांचवी ॥ चाल ॥ औषधगृहाणि तरुणि जंगे तेवि माधवा ॥ आश्विनय० ॥ २ ॥ अतंनुज्वरपीडित ती गोपि जाहली ॥ रसराज देऊनि सैख्यनिधे वांचवा भली ॥ करग्रहण त्यजिलें म्हणुनि लाधे काहली ॥ चाल ॥ रोमांचित झालि सखी भाव हा नवा ॥ आश्विनय० ॥ ३ ॥ श्वास सोडि करि विलाप कांपते पहा ॥ हर्षरहित वागते ति काळजी महा ॥ पिशाचवत्भ्रमण करी बोलते अहा ॥ चाल ॥ झांकि नेत्र, पडत भूमि, चिंति श्रीधवा ॥ आश्विन० ॥ ४ ॥

## साकी.

भलते वेळीं उठुनि धांवते मूर्छित होते फार ॥ ऐसि अवस्था राधेची ती होई वारंवार ॥ सदया रक्षी आज तिला ॥ आधीं देई वचन मला ॥ १ ॥

## पद.

चाल—( ऐक सख्या चातुरा० )

सदय उपेंद्रा हरी ॥ वैद्यराज तूं आतुडसी मज काय कठिणता तरी ॥ ध्रु० ॥ करसिल किति हट करितें मि खटपट करूं नको तापट परी ॥ दयाळा, करूं नको तापट परी ॥ कामज्वर करि जाच ॥ होतो बहुविध नाच तूं तिचा माणिपाच सांग कि बा मुरहरी ॥ सदय उपेंद्र० ॥ १ ॥ अंगसंग सुखकर तुझा तिस प्रियकर कसें करूं नाहिं धीर अवघड हें जाहलें ॥ केशवा अवघड हें जाहलें ॥ ज्वरविरहित तिज करसिल जरि अज गमऋसे तरि मज वाचेल ती सुंदरी ॥ राधिका वाचेल ती सुंदरी ॥ करसिल न च असे लागेल तिस पिसें करूं

तरि आज कसें सांग मजसी झडकरी ॥ माधवा, सांग मजसि झडकरी ॥ सदय उपेंद्रा हरी० ॥ २ ॥

## पद.

चाल—( केशव करणी अद्भुत लीला० )

स्मरसंतापें तापुनि गेली चंचळतनु राधिका ॥ ढाळिते आपुल्या नेत्रोदका ॥ ध्रु० ॥ मलयज चंदन चंद्रकमलिनी सीतल उपभोगते ॥ परि बहु ग्लानी ती पावते ॥ हेंचि गमे आश्चर्य माधवा विचारूनि मानसें ॥ राधा अंतरिं तुज ध्यातसे ॥ कांहीं पुनरपि तवक्षमेच्या योगें विश्वासते ॥ श्यामसुंदर रूप चिंतिते ॥ चाल ॥ पहा पहा राधिका क्षीण बहुत जाहली ॥ तव ध्यानामाजी निशिदिनिं ती गुंतली ॥ अति कृश दिसत जी करुनि मनीं काहली ॥ चाल प० ॥ दर्शन देउनि बल्लवनृपंत वांचवि करि कौतुका ॥ आतां कां आग्रह धरिसी फुका ॥ स्मरसंतापें तापुनि गेली चंचळतनु राधिका ॥ ढाळिते आपुल्या नेत्रोदका ॥ १ ॥

## साकी.

हे श्रीकृष्णा कमललोचना पीतांबरपरिधाना ॥ अंतरलें तव दर्शन मजला हेंचि वदे शुभरदना ॥ वृषभानूची ती दुहिता ॥ बसली करित मनीं चिंता ॥ १ ॥ साहना तव विरह माधवा निमेषमात्रहि तिजला ॥ पुष्पिताग्रा रसाल शाखा पाहतां जीव न रमला ॥ सखि ती वाचेल काशि देवा ॥ वसंतसमयीं वासुदेवा ॥ २ ॥

यानंतर कवि अध्यायाचे अंतीं आशीर्वादात्मक काव्य रचितो.

## पद.

चाल—( उद्धवा शांतवन करजा त्या० )

होतांचि गोकुलावरती ॥ जलवृष्टी इंद्राज्ञेनें ॥ ध्रु० ॥

रक्षणार्थ हरिनें केला ॥ सदुपाय गिरी उपडीला ॥ गो वर्धन नामक पहिला ॥ त्यातळीं वृजजन आला ॥ ॥ चाल ॥ गोधनें गोपि गोपाळ ॥ यांचा तो करी प्रति पाळ ॥ मेघ वर्षे होउनी काळ ॥ परि त्यातें तृणवन्मानी ॥ १ ॥ अशि पाहुनि माधवमूर्ती ॥ कामातुर त्या व्रज-युवति ॥ अधराग्रें करुनी पुढती ॥ मुखकमलातें चुंबिती ॥ चाल ॥ तांबूल रंग आरक्त ॥ लागला वदनीं बहुत ॥ शोभे ऐसा चिन्हांकित ॥ नंदात्मज सुंदर श्याम ॥ होतां चि गोकु० ॥ २ ॥ गोपाल नटवर वेशी ॥ कंसातक तो हृषिकेशी ॥ अभया दे सर्व जनासी ॥ कल्याण करो सुख-राशि ॥ चाल ॥ जयदेवें गात पवित्र ॥ वर्णियेलें हरि चरित्र ॥ श्रवणानें तृप्तचि श्रोत्र ॥ लाभचिहो आपगांचा ॥ होतांचि गो० ॥ ३ ॥ इति श्री गीतगोविंद प्राकृतटीकायां स्निग्धमाधवो नाम चतुर्थ सर्गः ॥ ४ ॥

# गीतगोविंद सर्ग ५



यानंतर दूतिका जी ती भगवदाज्ञेकरून राधिकेसंनिध जाऊन बोलते, त्याचें कवि वर्णन करितो.

## साकी.

श्रीहरि बोले दूतिकेसि मग, येथें बसतों जावें ॥ राधे-प्रति संदेश कथाया बोधुनि तीतें यावें ॥ गावें मच्चारि-ताला ॥ हा जन उत्कंठित झाला ॥ १ ॥

## श्लोक. ( कामदा. )

तोषवी सखी राधिका मनीं ॥ कामकारिणी मिष्ट-भाषिणी ॥ दर्शनें मला हर्षवी असें ॥ सांग जाउनि सौख्य तें नसे ॥ १ ॥

## झूला.

अशी एकतांची वाणी ॥ निघे दूतिका ॥ तिथूनी ॥ येउ-नि राधासंनिधानीं ॥ कृष्णवचन सांगते ॥ १ ॥

## पद.

चाल—( पाहिन केव्हां सिंहासनिं माझा राजाराम कधीं सीताराम कधीं. )

कृष्णा संदेशा परिसे तूं सुंदरि बल्लवयुवती हे राधे ॥ ध्रु० ॥ घेउनि मन्मथ संगतीं वायू हिम नगिहुनि बहु अज वाहे ॥ विरहीजनांचें भेदि हृदय तो पुष्पसमुह तो लवलाहे ॥ कृष्ण० ॥ १ ॥ त्वादिय वियोगें दुःखित माधव यास्तव खेदा करित सदा ॥ अनुकुल तें प्रतिकूलाहे गमतें न मिळे कवणा सौख्य कदा ॥ कृष्ण० ॥ २ ॥ शतिल किरणशशांकहि जाळीं, दुःसह होतो तोचि

मला ॥ मदन विशिख तो हृदयीं खुपतो दिसतो मरणप्राय भला ॥ कृष्ण० ॥ ३ ॥ विकळित होउनि करित विलाप राधे निशिदिनि वनमाळी ॥ भ्रमरसमुह गुंजारव करितां झांकित श्रवणहो त्या काळीं ॥ कृष्ण० ॥ ४ ॥ त्वद्विरहानें अंतरि मन्मथ छाळितो यास्तव वितरागी ॥ काननिं वसतो भूवरि निजतो त्यागुनि सुंदर गृह भोगी ॥ कृष्ण० ॥ ५ ॥ राधे राधे संकीर्तन हें करितो जपतो विरहि हरी ॥ जयदेव बोले हर्ष सुवैभव आनंद भक्तां देवो करी ॥ कृष्ण० ॥ ६ ॥

## पद.

चाल—( मजवरती खचित आहे या स्त्रीचें० )

हे राधे पुर्वि जेथें घेउनियां तूजला ॥ स्मरयुक्त मेळवीला सिद्धीचा मासला ॥ ध्रु० ॥सखे त्याच निकुंजांत, मदनाचें तीर्थ तें ॥ जाणोनी वसे कृष्ण ते ठायीं सौख्य तें ॥ मानोनी तूज ध्यातो हे सुंदरि पाहि तें ॥ चाल ॥मृदुवचनें एकांतींचीं जपे मंत्र चांगला ॥ हे राधे पूर्वि० ॥ १ ॥ तप ऐसें करुनि वांछी आलिंगन सत्फला ॥ स्वर्गांतें वांछि योगी तद्वत हा मासला ॥ निकुंजीं जाउनि तूतें चिंतितसे तो भला ॥ आलिंगन त्वत्कुचांचें दृढ इच्छी, क्षोभला ॥ हे राधे० ॥ २ ॥

## पद.

चाल—( वाहवा थोर तूं भूपाळा० )

"वाहवा मंदसमिर वाहे ॥ यमुनातीरीं हरि राहे ॥ ध्रु० ॥ ऐशा सुस्थळिं व्रजयुवतींच्या पुष्ट स्तनांचे ठायीं ॥ चपल करद्वय ज्याचें शोभत ऐसा तो फणिशायी ॥ वाहवा० ॥ १ ॥ बृहन्नितंबस्तनयुतराधे रतिसुख स्वरूपसारें ॥ संकेतस्थळिं विद्यमान हरि, घे सौख्याचें वारें ॥ वाहवा०

॥ २॥ मदनमनोहर वेष जयाचा ऐसा नंदकुमार ॥ तोचि हृदयपति जाउनि निरखि भेटुनि शमवी मार ॥ वाहवा० ॥ ३ ॥ गमना विलंब न करी, तो तुज निशिदिनिं स्मरतो नाम ॥ राधे राधे राधे जपतो, पूर्ण करी तूं काम ॥ वाहवा मंद० ॥ ४ ॥ वेणुवादनें सुचवी आपुली संकेताची जागा ॥ मंजुळध्वनिनें चिंतन करितो सत्वर सखये जा गा ॥ वाहवा० ॥ ५ ॥ तवतनुपासुनि निपजे वायू त्याच्या रेणू-लागो ॥ मान बहुत तो देतो मुररिपु होई सादर वेगीं वाहवा० ॥ ६ ॥ तवागमन हें झालें मानित तरुंचीं पानें हालतां ॥ जातां पक्षी कोमलपालवीं शय्या रचि एकांता ॥ वाहवा० ॥ ७ ॥ चंचलनेत्रें मार्गप्रतीक्षा करितो राधे जाण ॥ आभरणें नूपुरादि त्यागी शंकास्पद हें मान ॥ वाहवा० ॥ ८ ॥

## पद.

चाल—( केलीस अशी काय परिक्षा तूं सखे गे )

केलिमाजि नुपुरझणत्कार तो नको ॥ चंचल बहु शत्रुपरि त्रास तो नको ॥ ध्रु० ॥ हे सखये राधिके तुं गाढ या तमीं ॥ चाल कुंजिं त्वरित अतां नाहिंग कमी ॥ भेटल तुज माधव तो संगतेंच मी ॥ चाल ॥ नीलवर्ण कांचुळि ले हट धरूं नको ॥ केलिमाजि नुपूरझणत्का० ॥ १ ॥ पूर्वपुण्य सुफळ योग तुजसि साधला ॥ हरिपासुनि विपरित रति सौख्य मासला ॥ वृषभानूनंदिनि हा योग चांगला ॥ चाल ॥ स्वर्णवर्ण कांति तुझी, आळस नको ॥ केलि० ॥ २ ॥ मुक्ताफळहार भारभूत तो उरीं ॥ शोभसि घनवर्णी वरि चपल खगपरी ॥ सौदामिनि समान सखे भासशी खरी ॥ चाल ॥ पक्ष्यापरि हार उडे तूं रुसूं नको ॥ केलि० ॥ ॥ ३ ॥

## साक्या.

श्रीहरि हृदयावरि शोभसि तूं राधे पुरुषाकार ॥ स्त्रीकर्तृकविपरीतभारहि सुरतीं सुखकर फार ॥ राधे ऐसें समजावें ॥ भावें हरियश मुखिं गावें ॥ १ ॥ वस्त्राच्छादन वर्जित ऐशा जघनस्थानीं जाण ॥ कांचिरहित ती रशना करणें, विपरित रतिचा मान ॥ होइल बरवा सखये गे ॥ यापरि कृत्य करीं वेगें ॥ २ ॥

## इंद्रसभा.

यासमयीं यामिनीचा होऊं पाहे अंत ॥ खंत न करि उसंत घेई ॥ सौख्य रति पसंत ॥ १ ॥ माझें वचन मानि साच ॥ कथिलें तुज जाण ॥ आदर करुनि पुरवि काम ॥ तोषवि भगवान ॥ २ ॥

यानंतर श्रीहरिकडे जाण्याकरितां राधेस दूतिका पाठविण्याचा प्रयत्न करितें.

## अंजनीगीत.

राधे मन्मथमंजरि सुंदरि ॥ तुझा प्रियकर हरि दनुजारी ॥ स्मरपीडनें सोडी भारी ॥ श्वासा बहुवार ॥ १ ॥ रूप तुझें हें पाहुनि सुमनीं ॥ ध्यान करी तो हे मृगनयनी ॥ दिशा पाहे तो निरखूनी ॥ व्यग्र चित्तानें ॥ २ ॥ कुंजीं राधे तूं येणार ॥ म्हणुनि पाहे वाटचि फार ॥ कोठें असशी तूं सुकुमार ॥ म्हणुनी हरि पुसतो ॥ ३ ॥ उत्कंठित चित्तानें वदतां ॥ प्राणसखे तूं धांवत आतां ॥ येई झडकरि, योगचि पुरता ॥ करूनी सुख देई ॥ ४ ॥ वारंवार शयन रचितो ॥ कोमल पल्लव आणुनि बघतो ॥ प्रिया न येतां दुःखित होतो ॥ व्याकुळ बहुसाल ॥ ५ ॥

## पद. ( प्रभातीं भूपाळी.)

तव अभिमाना सहित राधिके रवि अस्ता गेला ॥

समय रात्रिचा आला सखये सौख्य निधी ठेला ॥ ध्रु० ॥ चक्रवाक पक्ष्याचेपरि मम दीन वाणि जाहली ॥ हे वेडे तूं न करि विलंबा होते मनिं कहाली ॥ तव अभि० ॥ १ ॥ गमनसमय रजनीचा हा बहु सुंदर मज गमतो ॥ आंधारामाधि नकळे कवणा स्त्रीसि पुरुष रमतो ॥ तव अभिमाना० ॥ २ ॥

## साकी.

यामिनिमाजी परयुवती परपुरुष सुरतसंकेता ॥ करुनि निबिड अंधारीं भेटति परिचय कांहीं न होतां ॥ भाषण करुनी ओळखिती ॥ परस्पर आपणां जाणविती ॥ १ ॥

## दिंडी.

रतीसमयीं प्रथम आलिंगनानें ॥ सौख्य देती उभयतां बहुत मानें ॥ तयानंतर चुंबनेंकरुनि सारा ॥ नखोल्लेखा करिताति प्रेम सारा ॥ १ ॥ तयानंतर मन्मथ प्रकाशानें ॥ प्रीतिधारक नव सुरस सौख्यमानें ॥ मिश्र लज्जेनें ना कवण या रसाला ॥ पूर्णशृंगारीं लिप्त ना सुखाला ॥ २ ॥

## पद.

चाल—( तस्करा हातीं, द्विजगोधन हरिलें. )

सुमुखी राधे, परिसे सुखसरितें ॥ मनोरम ऐशा श्रीहरितें ॥ भज तूं भावें ॥ भावें संसारीं ॥ तुझ्यास्तव बसला कंसारी ॥ निबिड आंधारीं ॥ एकाकी अदरीं ॥ पाहे वाट तुझी सारी ॥ करुं नको ऐसें ॥ रजनी माजी तो ॥ भय विस्मित बहु बसतो ॥ मुखानें नाम तुझें घेतो ॥ साशंकित हृदयीं ॥ राहुनि पद चाले ॥ मंद गतीनें तो हाले ॥ ठेउनिया चरणां ॥ कामोल्हास अंगें, पाहुनि तुझिया प्रसंगें ॥ होईल वनिं धन्य, धन्याचि जो वेगीं ॥ मानिल सौख्याचि आपणातें ॥ सुमुखी राधे० ॥ १ ॥

यानंतर कवि जो तो अध्यायांतीं मंगलाचरणानें करितो.

## पद.

चाल—( नंदगृहाच्या जवळि मुलींनीं० )

देवकिनंदन कृष्ण परात्मा रक्षो अखिलांतें ॥ सदोदित रक्षो अखिलांतें ॥ ध्रु० ॥ राधा मनोरममुखकमलातें ॥ भ्रमरापरि जो मानि सुखातें ॥ लुब्ध होउनी करि प्रिय नातें ॥ आहे तो कैसा ॥ मागुतो ॥ आहे तो कैसा० ॥ १ ॥ स्वैरवृत्तिनें वागुनि श्रीहरि ॥ बल्लवयुवतीसि सुख दे झडकरि ॥ संध्यासमयीं तोचि व्रजांतरिं ॥ येतां गहनांतुनी ॥ सख्यांसह ॥ येतां० ॥ २ ॥ भूभारातें दूर कराया ॥ समर्थ प्रभुवर अघटित माया ॥ कंसतृणातें दहन कराया ॥ प्रकटे अग्निपरी ॥ गोकुळीं ॥ ३ ॥ चरित्र ज्याचें पातक हरितें ॥ पादसलिल जग पवित्र करितें ॥ जयदेवाचें मानस वरितें ॥ हरिच्या चरणांसी ॥ वरितें ॥ ४ ॥ इति गीतगोविंद प्राकृतटीकायां अभिसारिका साकांक्षपुंडरीकाक्षो नामपंचमःसर्गः ॥ ५ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंद सर्ग ६



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ अथ गीतगोविंद षष्ठमसर्गप्रारंभः ॥

## साकी.

श्रीहरिसूचित लतागृहातें निरखायास्तव राधा ॥ गमन कराया शक्त न होउनि बहु दिन साही बाधा ॥ होती उत्कंठित मंद ॥ हृदयीं यदुपतिचा छंद ॥ १ ॥ मन्मथ-क्लेशें मंद बहुत तो ऐसा माधव जाण ॥ सत्संन्निध ती दूती येउनि करित सखीचें गान । राधा-चरित्र हें वाणी ॥ सावध परिसे चक्रपाणी ॥ २ ॥

## पद.

चाल—( धन्य उषाही बाणकन्यका अतिला० )

नाथ हरे तूं नाथ हरे हे स्वामी श्री हरि, व्रजयुवती ॥ निवासस्थानीं तव उत्कंठे राधा खेदा बहु करिती ॥ ॥ ध्रु० ॥ विषाद मानुनि सदा वागते लक्षुनि तुजला लव-लाही ॥ दाहिदिशां मधि पाहते माधवा, तव अधरामृत इच्छा ही ॥ नाथ हरे० ॥ १ ॥ आनंदानें प्राशन करितो ऐसा यदुपति कंसारी ॥ नाथ हरी हें वृषभा वदती गूढा-र्थामाधि संसारीं ॥ नाथ हरे ॥ २ ॥ राधेसम स्त्री त्यागुनि दुसऱ्या युवतीलागीं बहु झटतो ॥ मुख्य अर्थ तो बाह्य-प्रकट मन नाथ हरे स्वामीसि रतो ॥ नाथ हरे० ॥ ३ ॥ तुजकडे याया, आनंदानें वृषभानूचि ती दुहिता ॥ मार्गामाजी पदें ठवितां पतन पावते सुखसरिता ॥ नाथ० ॥ ४ ॥

## इंद्रसभा.

चाल—( सुनरे मेरे देवरे० )

मृणालांकुराचि करी ॥ भूषणें सखि जाण ॥ सुरतोत्सव वरुनि मनीं ॥ रक्षि पंचप्राण ॥ १ ॥

### पद.

चाल—( काय मला भूल पडली भान हरप० )

भूषणांचि बघुनि लीला बोले राधिका ॥ मानासि आपुल्या हि स्वयें नगणि कौतुका ॥ ध्रु० ॥ हरिवांचुनि भूषण हें व्यर्थ भासते ॥ मीच हरी म्हणुनि भावि आपुल्या मतें ॥ केवो संकेतस्थळीं जावें बोलते ॥ चाल ॥ मेघापरि तिमिर बघे करित कौतुका ॥ भूषणा० ॥ १ ॥ घनःश्याम पाहुनियां मेघ चांगला ॥ परिरंभण चुंबन दे बळेंचि त्याजला ॥ यायातें उशिर घडे जीव त्रासला ॥ ॥ चाल ॥ नगणि उपरि कवणा, करि रुदन गोपिका ॥ भूषणांचि बघुनि० ॥ २ ॥ बोले जयदेव कवी कवनमालिका ॥ हरिचरित्र कामधेनु आवडो भाविकां ॥ श्रवणपठणें मोक्ष घडे होइना फुका ॥ चाल० ॥ भवसागरिं तारक विभु वारि माइका ॥ भूषणांचि० ॥ ३ ॥

### पद.

चाल—( रुचती कां तीर्थयात्रा या समयीं० )

हे धूर्ता वंचका रे वृषभानूनंदिनी ॥ मृगनयना सुभगराधा इच्छितसुखकारिणी ॥ ध्रु० ॥ कामातुर होउनियां चिंतेच्या सागरीं ॥ मग्न सदा होउनीयां ध्याते तुज श्रीहरी ॥ पुलकांकित देह, नित्य सोडितसे वारिवार ॥ चाल प० ॥ निज श्वासा, माधवा रे दुःखित ती कामिनी ॥ हे धूर्ता वंचका रे० ॥ १ ॥ येतां तूं ध्यानिं तीचे, नखरेखा आठवी ॥ शोकानें व्याप्त होई; तूं तारक या भवीं ॥ सा-

होवें दुःख कैसें; सांगे तूं लाघवो ॥ चाल प० ॥ कामानें धुंद झाली निर्विमोचन कल्पुनी ॥ हे धुर्ता वंचकार० ॥ २ ॥

## पद.

चाल— ( उद्या व्रध जातें ॥ नृप सिंहासनरामा० )

पहा हरि तीतें ॥ दुःखानें रात्रिस नेते ॥ ध्रु० ॥ वृषभानूची ती बाळी ॥ सुंदरांगि बहु वेल्हाळी ॥ तुझ्याविरहें भो वनमाळी ॥ कष्ट भोगी ते ॥ पहा हरि० ॥ १ ॥ राधा, कर चरणांचे ठायीं ॥ अलंकार हे रचित पाही ॥ वृक्षपर्ण हालतां ते हीं ॥ तुज मानीते ॥ पहा हरि० ॥ २ ॥ वेष भूषणें करुनि नाना ॥ शयना रचित करुनि विताना ॥ शतसंकल्पाची ती रचना ॥ चाल ॥ तुझ्यास्तव करिते ॥ पहा० ॥ ३ ॥ कृष्णा तवप्राप्तिस्तव जाण ॥ लागलें राधेला हें ध्यान ॥ तुझी प्राप्ति न होतां खाण ॥ चाल० ॥ विषाची गणित ॥ पहा हरि तीतें० ॥ ४ ॥

यानंतर कवि अध्यायाचे अंतीं मंगलानें रचितो.

## साकी.

राधा पथिका पाहुनि बोले, नंदगृहाप्रति जावें ॥ या माजी अर्थद्वय शोभे तेचि सुयश मुखिं गावें ॥ भावें श्री हरिचें चरित ॥ जें कां भवभय दूर करित ॥ २ ॥

## दिंडी. ( अर्थ पहिला )

कृष्ण भोगी भांडीर वटाखालीं ॥ नको जाऊं ते स्थळी यया कालीं ॥ कशी विश्रांती मिळे बंधुराया ॥ अगा पथिका, ही समज पूर्ण माया ॥ १ ॥

( अर्थ दुसरा. )

सर्पभीतीनें पथिक पुढें जातां ॥ कृष्ण नामक भोगी च

या गुढार्था ॥ नेणुनियां तो दोष अखिल जागा ॥ म्हणे राधा तें नंदसदनिं जागा ॥ २ ॥

## अंजनीगीत.

साभिप्राय राधेचें वचन ॥ अर्थाचें जें करित गोपन ॥ श्री हरि अस्तमितीं जाण ॥ करी पूजन अतिथींचें ॥ १ ॥ सर्वोत्कर्षें वागतात ॥ अभिप्रायासह हेंचि ह्यर्थ ॥ राधावाणी गणुनि प्रशस्त ॥ एकुनि सुख जाहलें ॥ २ ॥ इति गीतिगोविंद प्राकृतटीकायां वासकसज्जावर्णने सोत्कंठ वैकुंठानाम षष्ठमः सर्गः ॥ ६ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंद सर्ग ७



॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥

यानंतर चंद्र उगवला, त्याच्या दर्शनेंकरून झालेल्या राधेस मदन-व्यथेच्या वृद्धीचें कवि वर्णन करितो.

॥ दिंडी. ॥

कसा यामिनिचा चंद्रमा विराजे ॥ सीतकिरणांनीं सदोदित साजे ॥ लांछनाची भा असे जया अंगीं ॥ प्रकाशाची मालिका त्याप्रसंगीं ॥ १ ॥

साकी.

पूर्वदिशा ही कोणी युवती तीचे वदनावरचा ॥ तिलक चंद्रमा ऐसा गमला सुखदायक तो साचा ॥ तरुणी जाराकडे जाया ॥ भासे विघ्नचि जो उभयां ॥ १ ॥

कामदा.

चंद्रमंडला पाहुनी वरी ॥ राधिका मनीं झालि घाबरी ॥ दीर्घ तो करी शोक अंतरीं ॥ काय मी करूं धांव श्री हरी ॥ २ ॥

राधिका आपल्या मनाशीं बोलते.

पद.

चाल—(रामकरीं जरि नृपपद गेलें० )

काय असें हें विपरित झालें ॥ हरिनें येणें कां नच केलें॥ पंचप्राण मम कंठीं आले ॥ कैसें करु बाई ॥ १ ॥ मीनापरि मी बहु तळमळतें ॥ यौवन माझें व्यर्थचि जातें ॥ सफल मनोरथ होति न पुरते ॥ आतां काय करूं ॥ २ ॥ निर्जनविपिनीं कोठें पाहूं ॥ कवणा येथें शरण मी जाऊं ॥

विरहदशेतें कैसी साहूं ॥ आतां मी मरतें ॥ ३ ॥ सखीजनानें मज वंचियलें । येतो श्रीहरि म्हणुनि कळविलें ॥ कैसें नाहीं मन वळवीलें ॥ जाउनि ते ठायीं ॥ ४ ॥

## पद.

चाल—( उरला भेद न ज्यां कांहीं० )

ऐशा घोर मि गहनांत ॥ भ्रमतें एकाकी ध्यात ॥ हरिपद आणुनि हृदयांत ॥ जाहलें कामानें व्यथित ॥ चाल ॥ आगमन नाहीं हरिचें तें ही येथें, सखे बाई ॥ पाहूं कोठें फणिशायी ॥ जाहली शरीराची लाही ॥ पाहूं० ॥ १ ॥ जरि मज येइल अजि मरण ॥ तरि सुख होइल परिपूर्ण ॥ सजिव मी असतां सौख्यधन ॥ न घडे हरिचें दर्शन ॥ चाल ॥ काय करूं मी, चैन पडेना, आणा लवलाही ॥ पाहूं कोठें फणिशायी ॥ २ ॥

## पद. ( होरीच्या चालीवर. )

( यारंगधूममचाऊ ॥ जदमनमोहनपाऊ ॥ )

सजिव असूनी हेंचि कलेवर व्यर्थाचि अज मज हें गमतें ॥ काननिं आधीर चैन पडेना विफलचि मन भ्रमतें ॥ कोठें माधव गहनीं पाहूं ॥ करणा शरण मी जाऊं ॥ १ ॥ हा हा देवा काय करूं तरि सुंदर माधवसमयीं ॥ रजनीं मज बहु दुःखित करिते छळितो मन्मथ बाई ॥ कोठें० ॥ २ ॥ पुण्यवती ती युवती हरितें अनुभावितें सखि बाई ॥ दुःखित मी या काननिं रडतें पडतें भूवरि पाही ॥ कोठें० ॥ ३ ॥ शिव शिव ऐसे खेदयुक्त निजशब्द स्वभावें ते वदतां ॥ रत्नखचित वलयासिच धरितें दूषण हें विरहव्यथितां ॥ कोठें० ॥ ४ ॥

## पद.

चाल—( हवतीं कां तीर्थयात्रा यासम० )

पुष्पाची सुखद माळा विषमाच्यापरि गमे ॥ पुष्पधन्वा

छळी मातें न च कोठें मन रमे ॥ ध्रु० ॥ पुष्पाची मालिका ही मम तनुतें श्रम करी ॥ हृदयीं मी दग्ध होतें ताडण हें त्यावरी ॥ विरहानें त्रस्त झाली स्थिर नाहीं अंतरीं ॥ चाल ॥ स्मरशर हे दुःख देती हरिवांचुनि मी श्रमे ॥ पु० ॥ १ ॥

## पद.

चाल—( केलीस अशी काय परीक्षा० )

वनवेतस गाणिले मी जाउनी त्वरें ॥ येथें हरि तेथें हरि असेल सादरें ॥ ध्रु० ॥ कोठें तरि शोधुनि मी पाहिन मुरहरी ॥ सुंदर मनमोहन तो विष्णु भूवरी ॥ प्रगट दिसे जनालागि चरित हें करी ॥ चाल ॥ वनवेतसगणन झालें हेतु न च पुरे ॥ येथें हरि० ॥ १ ॥ मधुसूदन नाठवि मज असें कसें तरी ॥ जयदेवाचीच अशी वदलि वेखरी ॥ सुंदर कौशल्ययुक्त, वसो मनीं बरी ॥ चाल ॥ कलावती तरुणिपरी बघुनि हृदि झुरे ॥ वनवतस० ॥ २ ॥

यानंतर राधा हरीच्या आगमनीं तर्क करिते.

## पद.

चाल—( अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली. )

कुंजगृहाप्रति येतों म्हणउनि संकेतचि केला ॥ असतां सुंदरवेतससदनीं कां हरि न च आला ॥ ध्रु० ॥ नवयुवतींसह अनुसरला कीं काय असें झालें ॥ हास्यविनोदासहित केलो करितां मन धालें ॥ कुंज० ॥ १ ॥ किंवा गोपाळांनीं बसउनि ठावयलें हरिला ॥ अथवा अंधःकारामाजीं मार्ग स्वयें चुकला ॥ कुंजगृ० ॥ २ ॥ येणारा जो नित्य गृहाप्रति त्यातें पथ कळतो ॥ काममदें हरि धुंद जाहला तर्क असा वळतो ॥ कुंज० ॥

## पद.

चाल—( वीरशिरोमणी सकल धनुर्धर० )

यानंतर ही राधा माधव संगें न च घेउनी ॥ आली सखी तीतें मग पाहुनी ॥ ध्रु० ॥ बोले प्रियकर कवणे स्त्रीनें मोहुनि नेला घरीं ॥ अहा ही गोष्ट झालि ना बरी ॥ ऐशा विभुच्या सन्मूर्तीचें दर्शन निज अंतरीं ॥ जाहलें भावितसे सुंदरी ॥ शंका करुनी आपुल्या चित्तीं बोलति जाहली बरी ॥ होउनी तव्हां बहु घाबरी ॥ केलि प्रतिज्ञा आणावयाची हरिला, ती वाउगी ॥ जाहली, यास्तव बसली उगी ॥ १ ॥

## दिंडी.

विषादानें उन्मादयुक्त बोले ॥ चित्तिं करुनी कल्पना तदा डोले ॥ स्वयें केला पण तोहि व्यर्थ गेला ॥ सिंधु विरहाचा मनामाजि ठेला ॥ १ ॥

राधिका आपल्याशी कल्पना करते.

## पद.

चाल—( रुचती कां तीर्थयात्रा या समयीं० )

मजहूनी चपल कोणी सुंदरि नवयौवना ॥ कामिनी सद्गुणानें गमली कीं पावना ॥ ध्रु० ॥ मृगनयना घेउनि ऐसी रमताहे श्रीहरी ॥ मज वाटे सुखानंदें स्मरसमरा सादरी ॥ सालंकृत वेष जीनें रचिला निजतनुवरी ॥ ॥ चाल ॥ अस्ताव्यस्त केश झाले रतियुद्धें सुख मना ॥ मजहूनी० ॥ १ ॥ कुचकलशांवरी शोभे चंचल बहु हार तो ॥ तधि चंचलकेशयोगें मुखचंद्र शोभतो ॥ हरि अधरामृतपानें करि निद्रायोग तो ॥ चाल ॥ ऐसी जी युवति हरिच्या सह रतली यौवना ॥ मजहूनी० ॥ २ ॥

## पदं.

चाल—( मसि बोलुं नको गिरिधारी )

कानिं कुंडलें शोभति नामी ॥ वाणुं किति तरि अज महिमा मी ॥ ध्रु० ॥ तिहींकरुनी गंडस्थळ शोभे ॥ पाहतां रमणीमानस लोभे ॥ कानिं० ॥ १ ॥ आणिक नादित मणिमेखला ती ॥ जघनगता, बहूचंचल असती ॥ कानिं ० ॥ २ ॥ श्रीहरिनें तिजला वानिं बघतां ॥ लज्जित झाली भाषण होतां ॥ कानिं० ॥ ३ ॥

## साक्या.

सुरतायासजनितनिःश्वासें करुनि निमीलितनेत्रा ॥ परमानंदामाजीं जो कां डुलतसे शुभगात्रा ॥ मन्मथ आलस्यें जाण ॥ प्रतिरति भासे मूर्तिमान ॥ १ ॥ सुरतश्रमानें श्रांत जाहल्यापरि भासे भगवान ॥श्रीकृष्णाच्या उरःप्रदेशीं राधा होई लीन ॥ विरहाग्नीचा अपमान ॥ विसरुनि मानित सन्मान ॥ २ ॥

## दिंडी.

कवी जयदेवें चरित गान केलें ॥ श्रवणपठणें कलिदोष जळुनि गेले ॥ सदा भक्तां शिव करो असे बोले ॥ हरि ऐकुनि सप्रेम मनीं डोले ॥ १ ॥

राधा आपल्या सखीस भाषण करिते.

## पद.

चाल—( केशव करणी अद्‌भुतलील० )

हे सखये हरिवदन कमल तें पांडुवर्ण जाहलें ॥ प्रियतम श्रीविरहानें भलें ॥ ध्रु० ॥ मदनाचा सन्मित्र चंद्रमा मजला धिःकारितो ॥ रतिचा उद्दीपक भाव तो ॥ हे सखये० ॥ १ ॥

राधा उत्कंठित होऊन पूर्वप्रमाणें कल्पना करिते

## पद.

यासमयीं हरि रतिरंगामधि निमग्न यमुनातिरीं ॥ वृंदावनिं रमतो कवणे परी ॥ ध्रु० ॥ ऐसि कल्पना करुनि बोलते करस्पर्शें प्रमुदित ॥ अभिवृद्ध आहे जिस मन्मथ ॥ ऐसें असुनिया चुंबन घ्याया वळला कीं निश्चित ॥ ज्या अधरोष्ठीं लक्ष्मी रत ॥ श्रीहरि कोणी एक तरुणीचें वदनिं तिलक रेखित ॥ कस्तुरि आणुनियां किंचित ॥ हरि करस्पर्शें सकाम जाहली रोमांचित अद्भुत ॥ तनुवरि कंप असे तो नित ॥ चाल ॥ हा मुखसौंदर्ये करुनी उत्तम खरा ॥ सकाम, रोमांचानें दाखवि बहु नखरा ॥ तरुण चंचल मुख युवमाधव वनिं साजिरा ॥ चाल ॥ व्रजयुवतींच्या वेणीमाजीं पुष्पें गुंफित हरी ॥ पुढें तिस घेउनियां सत्वरी ॥ सौदामिनिपरी राजित दिसतो स्मरमृगवासस्थळ ॥ भासते आकाश तें निर्मळ ॥ मुक्तमण्यांचा हाराचे उत्तम नक्षत्रें सोज्वळ ॥ योजितो त्या जागीं न च खळ ॥ मृणालखंडापरी सरळ बहु लाजावे त्या केवळ ॥ हरिचें चरित नाशि कलिमळ ॥ करतल तेंची नलिनीपत्रें ज्यामाजी कोमळ ॥ कैसी हिमवत ती सीतळ ॥ चाल ॥ मृदु भुजद्वय जें त्याचें ठायीं बरे नीलवर्णमरकतमणी खचित साजिरें ॥ कांचनमय कंकण जेंवि भ्रमर संचरे ॥ चाल ॥ त्यात अर्पि तो भुजद्वय तें भ्रमर पंक्तिच परी ॥ मरकतमणि कंकण साजिरी ॥ १ ॥

### साक्या

पुष्ट आकृति आहे ज्याची ऐसें सुंदर जघन ॥ कामाचें कनकासन रतिगृह शृंगाराश्रय जाण ॥ सुंदरवस्त्राच्छादित ज ॥ तयापुढ तोरण हो लाजे ॥ १ ॥ त्याहि तोरणापेक्षां सुंदर ऐसी मणिमय रशना ॥ मुक्त मण्यांची तीतें

थापी भूपाळाचे सदना ॥ सुंदर सिंहासन जैसें ॥ जघन तें मदनासन तैसें ॥ २ ॥

## दिंडी.

राम साक्षात् मज रमास्थान साचें ॥ असे निजहृदयिं चिन्ह माधवाचे ॥ कोणि युवतीचें चरणकमल शोभे ॥ तयाहृदयीं पाहतां सुमन लोभे ॥ १ ॥

## अंजनीगीत.

स्पष्टलाक्षारसें करुन ॥ करितो त्यातें जो निर्माण ॥
निद्रित स्त्रीच्या चरणीं बसुन ॥ धरितो पद हृदयीं ॥ १ ॥
तेंचि रेखितो ऐसें गमते ॥ माणिकाची माला दिसत ॥
तेणें करुनी पुजिलें जणु तें ॥ यापरि मज भासे ॥ २ ॥
बलभद्राचा बंधु मुरारी ॥ संगति तरुणी घेउनि नारी ॥
प्रेमातिशयें रमवी भारी ॥ लतागृहीं जाणा ॥ ३ ॥
विषादयुक्त व्यर्थ बहुत ॥ कठिण काळ हा सखये जात ॥
हलधर शब्द भाव पूर्ववत ॥ जाणविला येथें ॥ ४ ॥ शृं-
गारमिषें करुनी जाण ॥ केलें श्रीहरिचें चिंतन ॥ जय-
देवाचें पातक दहन ॥ होवो या गीतें ॥ ५ ॥

सखीच्या विषादातें शमन करीत होत्साती राधिका बोलते.

## पद.

चाल—( साध्य नसे मुनिकन्या परिमन० )

निष्ठुर माधव तो ॥ सखये, तुजसह केवी न आला ॥ ध्रु० ॥ येत नसे हरि ह्मणुनी श्रमसी ॥ अंतःकरणीं दुःखित होसी ॥ निष्ठुर ठक त्या काय तुं करिसी ॥ आश्चर्य वाटे मला ॥ सख० ॥ १ ॥ बहुयुवतींचा पति तो, रमतो ॥ स्वच्छंदानें कार्य साधितो ॥ कपटी नाटकि चेटाकि हरितो ॥ दूषण देउं कसें ॥ सख० ॥ २ ॥ प्रिय-कर श्रीहरि तच्चातुर्या ॥ भुललें पाहुनि बहु सौंदर्या ॥

**उत्कंठेनें बलुत्र-वर्या ॥ संगमिं मन रिघतें ॥ सख० ॥ ३ ॥**

राधिका सखीस पुन्हां भाषण करिते. अगे सखी, तू कां बरें मंताप्नेस, असें जर तूं मला विचारशील तर सांगतें ऐक.

## पद.

चाल—( केशव करणी अभ्दुत लीला० )

हे सखि सुदती परिस आतां वायूनें जाहलें ॥ कमल बहु चंचळ जळिं भासलें ॥ ध्रु० ॥ तद्वत्नयनें ज्याचीं ऐशा श्रीहरिनें निरखिलें ॥ पुर्वी युवतिरत्न रमविलें ॥ तवविरहास्तव कोमल तरुच्या पालविवरि त्यागिलें ॥ आपुल्या देहातें श्रमविलें ॥ त्या संतापा शमवायासी हेंचि मनिं आणिलें ॥ न पडे न घडे ऐसें भलें ॥चाल॥ श्यामसुंदर मोहनवदन हरिनें भली ॥ ती तरुणगोपिका सप्रेमें रमविली ॥ स्मरबाण लागतां जाहली मनिं काहली ॥ चाल ॥ प्राणतियेंचा न फुटे न घडे फुटेल हें भाविलें ॥ दुर्दैवाचि हें समजुनि आलें ॥ हे सखि सुदती० ॥ १ ॥

## पद. ( हमीरकल्याण )

॥ कां गणपति आगमन० ॥

सुधारस कोमल मंजुल तो ॥ तसें प्रिय मंजुल जो वदतो ॥ रमाधव युवती रमवीतो ॥ चाल ॥ वृंदवानिं तिस, दक्षिण वायू , छळितो बहु साचा ॥ प्रकाराचि ऐसा विरहाचा ॥ नाहीं स्मरशर हा काचा ॥ १ ॥ स्थलकमलाची कांति जशी ॥ तैसे करपद ज्या तनुसी ॥ ऐसा माधव सुखराशी ॥ रमविलि त्यानें, ती विरहानें त्रस्त, न सौख्याचा ॥ भोग तिस, छल बहु मदनाचा ॥ नाहीं स्मरशर हा काचा ॥ २ ॥ चंद्रकिरणांमधि नेली ॥ परि जी शांत नसे जाहली ॥ दाहाचे पावत सुखवेली ॥चाल॥

वनमाली विण चैन पडेना, कथुं मी किति वाचा ॥ भाग हा मन्मथचरिताचा ॥ ३ ॥

## पद.

चाल—( उरला भेद न ज्यां कांहीं ॥ त्यांना कोठें भय० )

जलमय मेघापरि जाण ॥ श्यामसुंदर भगवान ॥ त्यानें रमविलि जी तरुण ॥ कामिनी पावे अपमान ॥ चाल ॥ विरहाग्नीनें, हृदय फाटुनी तरमळ करि कहाली ॥ दुःखित मानसि बहु झाली ॥ गेला त्यागुनि वनमाली ॥ दुःखित० ॥ १ ॥ सुवर्णनिकषापरि जाण ॥ दिव्य पीतवसन पूर्ण ॥ साजतें ऐसा श्रीमान ॥ रमवि जो तरुणी पाहून ॥ चाल ॥ सवती हांसती म्हणुनी श्वासा जी त्यजिती जाहली ॥ गेला टाकुनि वनमाली ॥ दुःखित मानसि० ॥२॥ सकल जे भुवनांतिल तरुण ॥ सुंदर त्यामधें भगवान ॥ जयदेव करितसे गान ॥ साधुनि प्रबंधर्धारे तान ॥ चाल ॥ यागीतापरि, रिघुनि सुहृदयीं करु हरि नित केली ॥ गेला त्यागुनि वनमाली ॥ दुःखित मानसि बहु झाली ॥ गेला० ॥ ३ ॥

यानंतर कामप्रकाशक दक्षिणवायुतें प्रार्थिते.

## साकी.

कामप्रदीपक 'चंदनवायो प्रसन्न व्हावें मजला ॥ क्रूरत्वातें त्यागुनि सुखवी आहे विरहिणि अबला ॥ पीडा नकरी बा आतां ॥ करितें विनवणि तुज ताना ॥ १ ॥

## पद

चाल—( स्वती कां तीर्थयात्रा या समयीं० )

हे वायो, लोकप्राणा, त्याहरितें स्पर्शुनी ॥ मजवरतीं वाहशी तूं स्मरपीडा देउनी ॥ ध्रु०॥ परि पाहे जाति माझे

सदया हे प्राण कीं ॥ यासाठीं श्रीहरीतें मजकडे तूं आण कीं ॥ विरहाग्नी जाळी मातें वाहतें मी आण कीं ॥ चाल प० ॥ उपकृतिही करी ऐसी अपराधा साहुनी ॥ हे वायो लोकप्राणा त्या हरितें स्पर्शुनी ॥ १ ॥

## साक्या.

सखये कैसा निर्दय जाहला मजवरि माधवराय ॥ त्याविण मजला चैन पडेना विगलित माझा काय ॥ सखिजन शत्रुपरी गमतो ॥ दाखवि सत्वर श्रीहरि तो ॥ १ ॥ सीतळवायू अग्नीचेपरि, अमृतरूप शशि भासे ॥ विषवत, मजला त्रासचि होतो सौख्यरूप तरु नासे ॥ मज सम विरहिणि अबलेला ॥ कैसा छळितो हा मेला ॥ २ ॥

## श्लोक—( कामदा. )

क्रूर होउनी काम तो कसा ॥ मारितो मला तिव्र तो कसा ॥ त्यामुळें पहा दुःख जाहलें ॥ कोण वारि या येउनी भलें ॥ १ ॥

## ओंवी.

श्रीहरिचे ठायीं मम मन ॥ मी निवारिलें असतां जाण ॥ पुनरपी जाऊनि जडतें आपण ॥ काय तया करावें ॥ १ ॥

## इंद्रसभा.

निर्दय हा काम बहू ॥ पुरुषाहुनि जाण ॥ कामिनिच्या निरंकुश ॥ न चले अनुमान ॥ १ ॥

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें )

भो मदना पंचप्राण ग्रहण हे करी ॥ जाइन मी गृहनिवास सोडुनी दुरी ॥ ध्रु० ॥ कृतांतभगिनि न करि क्षमा, तुजसि अनुचित ॥ आहेस तूं क्रूर, म्हणुनि ताडि किंचित ॥

ऊर्मीनें मदिय देह सिंचनाकरी ॥ शमेल दाह याच गुणें मेलियावरी ॥ भो मदना० ॥ २ ॥

## श्लोक.

( कामदाच्या चालीवर. )

भावयुक्त तो वंदिला हरी ॥ इंद्रनील तो मुकुट त्यांवरी ॥ भृंग शोभती, वाहत असी ॥ जान्हवी जडे पाइं हो जशी ॥ १ ॥ तप्त जाहली राधिका मनीं ॥ परमसंकटें जात यामिनी ॥ प्रकटला हरी नमन तत्पदीं ॥ रक्षि जें जनां नित्य आपदीं ॥ २ ॥

इति गीदगोविंदे प्राकृत टीकायां नागरनारायणो नाम सप्तमःसर्गः ॥

श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंद सर्ग ८



॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥

यानतर राधेनें परम संकटानें रात्र कंठिली व प्रातःकाळीं मत्सरयुक्त श्रीहरीस जें भाषण केलें त्याचें कवी वर्णन करितो.

## पद.

चाल—( वीर शिरोमणि श्रेष्ठ धनुर्धर० )·

मन्मथबाणें करुनी जर्जर झाली आशि राधिका॥ रजनिमधि काढुनि दुःखाधिका ॥ ध्रु० ॥ ऐशासमयीं शांत वनातें सांग कराया आला ॥ तो मनमोहन होउनी भला ॥ सन्मुख येउनि अकस्मात तें वंदनार्थ ठाकला ॥ नम्र बहु होउनियां राहिला ॥ चाल ॥ ऐसा पाहुनि मत्सरयुक्त वदे राधिका ॥ प्रणयपूर्वक तधवां गोपनायका ॥ कां गा छळिसी येउनि श्रीहरि मजला फुका ॥ चाल ॥ कपटि नाटकी चेटकि मुरहरि मारिसि हृदि सायकां ॥ आम्ही निर्बल कीं गोपिका ॥ मन्मथ० ॥ १ ॥

## पद.

चाल—( रुचती कां तीर्थयात्रा या समयीं० )

जा गा जा केशवा तूं यथुनिया झडकरी ॥ किति सांगूं माधवा रे हाहा शिव हरि हरी ॥ ध्रु० ॥ तवाचित्ता ताप दावी जी का स्त्री गोमटी ॥ जाई तूं शरण तीतें कथितें हें शेवटीं ॥ निजकर्मा लोपवोशी गमशी मज नाटकी ॥ चाल ॥ तव कर्मा कथिति नेत्र मजलागी मुरहरी ॥ जा गा जा० ॥ १ ॥ जागरणें लाल झाले तव चक्षू साचरे ॥ परक्षीचे ठाई घेसी सुख मजला जाचरे ॥ ओष्ठ रक्त कज्ज-

लानें कृष्ण वर्ण आचरे ॥ चाल ॥ चुंबनाचे योगें झाली अवस्था ही खरी ॥ जा गा जा० ॥ २ ॥

## पद.

चाल—( पाहिन केव्हां सिंहासनिं० )

मन्मथसंगरिं त्या युवतीचीं नखक्षतें त्या रेषेला ॥ अक्षरपंक्ती त्यामधिं ऐसें श्यामशरीर हें सुखमेला ॥ध्रु०॥ सुरतविजयनिवेदक लेखन सम स्वीकारिति समरांत ॥ क्रीडमाजी तदुपरि गमतें इंद्रनील मणि जगतांत ॥ मन्मथ० ॥ १ ॥ नीलशिलेपरि तव तनु शोभे कांचन सम जी, रतिविजय ॥ लिहिविला कां गमतें आतां, हाचि असे त्यांतिल आशय ॥ मन्मथ० ॥ २ ॥ हे केशव तव सुंदर हृदयीं चरणकमल त्या युवतीचें ॥ तत्संबंधीं लाक्षारस तो गळतो सिंचित चित्र जिचें ॥ ज्या योगानें मन्मथ प्रकटे ऐसे नूतन पल्लव ते ॥ अरक्त चिन्हें रक्तचि दिसती, मम हृदयांतरिं हें गमतें ॥ मन्मथ० ॥ ३ ॥

## साक्या.

तव अधरीं परनारीचे द्विज साच रुतले सारे ॥ मन्मानिं ते बहु खेदा करिती देती सुख परभारें ॥ माझ्या समाधान काळीं ॥ कपटी नाटकि,वनमाळी ॥ १ ॥ अन्य युवतिचें चिन्ह तवांगीं असतां कें मन वळतें ॥ उभयाच्या चित्तास मनोरम एकत्वानें चळतें ॥ या समाधानकाळीं ॥ कपटी नाटकि वनमाळी ॥ २ ॥

## दिंडी.

चंदनाच्या लेपनें करुनि तीचे ॥ कुचकुंभहि संलग्न ऐक्य साचें ॥ चंदनाचा तो बिंदु तुझ्या हृदयीं ॥ कसा शोभे तो आजि सुखद पाहीं ॥ १ ॥ मेघमंडळिं तो विद्यमान जैसा ॥ रम्य शुभ्राचि चंद्रमा पूर्ण तैसा ॥ समानत्वें पद अन्यत्र वीनाथें ॥ वाणियलें गीतांत सुखद येथें ॥२॥

## श्लोक. ( कामदा. )

कृष्णनाथजी, चित्त कृष्ण तें ॥ भासतें मला फार उष्ण तें ॥
अन्यभाषणीं प्रेम दाटलें ॥ मन्मथें मला साच गांजिलें ॥१॥

## ओंवी.

माझ्या सम स्त्रीजनास ॥ कैसा देतो मन्मथ त्रास ॥
कैसा ठकविसी आम्हास ॥ तव मानस कृष्ण तें ॥ १ ॥

## साकी.

युवतिजन ग्रासाया करितां काननिं फिरसी देवा ॥ नव्हे हें आश्चर्य, जयास्तव बाळपणीं करि हेवा ॥ वकिला तुवांच मारियलें ॥ आम्हां करिसिल तेंवि भलें ॥ १ ॥
जयदेवाचें वर्णन हें, रति समयीं वर्णिलि ऐसी ॥ खंडित कामिने वृषभानूची कन्या करिते कैसी ॥ रोदनसहित विलापातें ॥ परिसा श्रोते जन त्यातें ॥ २ ॥

## दिंडी.

खंडिता स्त्री राधिका असे जाण ॥ कसें ठकविसि वंचका त्यजुनि मान ॥ अन्यस्त्रीचे चरणांसि लावितो ही ॥ स्वयें लाक्षारस सुरस रक्त पाहीं ॥ १ ॥ त्या निमित्तें अनुराग जयाठायीं ॥ वसे ऐसी तव हृदयिं जे जया ही ॥ तया बघतें मी, प्रेमनाश झाला ॥ हरी मद्विषयीं मानि झाडपाला ॥ २ ॥

## श्लोक. ( शुद्ध कामदा. )

हृदयपुष्ट तें पाहतां हरी ॥ युवति अन्य ती सौख्य ती हरी ॥ रुदन त्यामुळें नेत्रिं दाटलें म्हणुनि लाजतें प्रेम आटलें ॥ २ ॥

यानंतर कवि कथासंबंधातें ठेऊन अध्यायाचे अंतीं आशिर्वादरूप मंगलातें रचितो.

## पद.

चाल—( केलीस असी काय परीक्षा तूं सखेगे )

नीलवर्ण कंचुकिधर या परी हरी ॥ पीतांबरधारि राधा शोभे सुंदरी ॥ ध्रु० ॥ सुप्रभाति वक्र दृष्टि करुनि बघतसे ॥ सखिजन तो मानासि स्वच्छंद हसतसे ॥ लज्जेनें चंचल निजनयन ही तसे ॥ चाल ॥ राधामुख बघुनि हसे मंद मुरहरी ॥ नील० ॥ १ ॥

## ओंवी.

ऐसा आधव श्रीकरधर ॥ कल्याण करो निरंतर ॥ श्रोते जनांचें मनोहर ॥ भावें जयदेव हें बोले ॥ १ ॥

इति श्री गतिगोविंदे विलक्षलक्ष्मीपतिर्नामाष्टमः सर्गः ॥ ८ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

---

# गीतगोविंद सर्ग ९



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः॥ अथगीतगोविंदे नवमसर्गप्रारंभः ॥

यानंतर सखी राधेतें उपदेशिती झाली त्याचें कवि वर्णन करितो.

## ओंवी.

नंतर मदनविकारें करून ॥ खिन्न झालें राधेचें मन ॥ शृंगाररसें करुनि भिन्न ॥ विषादसंपन्न जी असे ॥ १ ॥

## साकी.

ऐसी राधा कलहांरिता पश्चात्ताप पावे ॥ तीतें सादर येउनियां सखि वचना वदली भावें ॥ तें तुह्मि परिसा सज्जन हा ॥ श्रीहरिचरितीं मज्जन हो ॥ २ ॥

## पद.

चाल—( जाहली ज्याची उपवर दुहिता० ॥ )

मानवती वृषभानुनंदिनी तरुणी, सुरूपे, परिसावें॥ ध्रु० कृष्णाचे अपराध मनामधिं आणुनि न करी कोपातें ॥ मानवती० ॥ १ ॥ माधवशद्बें करुनि रमाधव प्रार्थित असतां कां न च पेकसि ॥ मान० ॥२॥ तवसंकेतस्थानीं येतो त्यावरी न करी रोष तुं राधे ॥ मानवती० ॥ ३ ॥ वसंतवायु वाहत असतां सदनाहुनि सुख अधिक कवण तें ॥ मानवती० ॥ ४ ॥

## साकी.

तालफलाहुनि अधिक मनोरम भागाचि कुचकलशां-चा ॥ श्रीहरित्यागें कैसा निष्फल करिसि, वदुनि कटु वाचा॥ हे सखये यासमयांत॥ कैसा करिसी निजघात ॥१

## दिंडी.

नको त्यागूं माधवाप्रती आतां ॥ स्वयें कथिलें तुजलागि गीत गातां ॥ पूर्वि वदलें सांप्रत हाचि बाई ॥ बोधे माझा, नच त्यागि शेषशायी ॥ २ ॥

## घनाक्षरी.

अस्ताव्यस्त होउनि फार ॥ विषाद करिसी वारंवार ॥ गमे हाचि चमत्कार ॥ रुदन करिसी काय गे ॥ १ ॥ सकलयुवति तुज बघुन ॥ हांसताति खदखदुन ॥ कमलपत्रशयनीं जाउन ॥ रमाकांत पाहि तूं ॥ २ ॥ सफलनेत्र करी नारी ॥ निरखी भावें मुरहारी ॥ ह्रदयीं करिसि खेद भारी ॥ क्षणामाजि काय हें ॥३॥ ऐक्यकारक वचनास ॥ करी श्रवण नकरि त्रास ॥ शयनस्थानिं सावकाश ॥ सुखें जावों माधव ॥ ४ ॥

## साक्या.

श्रीहरि तुजला वंदन करितां स्तब्ध उभी कां राहासी ॥ स्तंभापरि गे, द्वेषबुद्धिनें त्यागुनियां हृषिकेशी ॥ सन्मुख येतां फिरवीशी ॥ वदना, मुरडुनियां बसशी ॥ १ ॥ यास्तव विपरितकारिणि राधे चंदन विषसम होतो ॥ चंद्रहि भास्कर, हिमनग तैसा वैश्वानर सम जो ते ॥ क्रीडा सुखें वदनेतें ॥ देती सकलहि असुखातें ॥ २ ॥

यानंतर कवि अध्यायाचे अंतीं मंगलाचरण रचितो.

## पद.

चाल—( रुसली कां तीर्थयात्रा० )

मृगनयना तरुणगोपी, मनमोहन त्यांचिया ॥ हालवी जो मस्तकातें; निज चरितें करुनियां ॥ ध्रु० ॥ मोरमुकुट घनश्याम वंशी जो वाजवी ॥ वनमाला शोभे कंठीं

दाखवि भा बहु नवी ॥ साधुशब्दें करुनि भावें निजमाथा डोलवी ।। चाल ॥ ऐसा हरि स्वीयदासां देवो तो अभया ।। मृगनयना ० ॥ १ ।।

इति श्रीगीतगोविंदे मुग्धमुकुंदवदनोनाम नवमःसर्गः।। ९ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

---

# गीतगोविंद सर्ग १०



## साक्य

कर्कशक्रोधाधीन जाहली निःश्वासाच्या योगें ॥ अस-
ह्यवदना तेज लपालें, तीतें श्रीहरि वेगें ॥ प्रसन्न पाहुनि
अस्तामितीं ॥ बोले गद्गद तीजप्रती ॥ १ ॥ सखिवदनातें
अवलोकी जो पश्चातापें करुन ॥ चमत्कृतीतें निरखुनि ऐ-
शा बोले माधव दुरुन ॥ तें तुह्मि ऐका सज्जनहो ॥ क-
लिहर हरियशमज्जन हो ॥ २ ॥

## पद.

चाल—( नंदगृहाच्या जवळि मुलींनीं दिसतां रथ० )

मत्प्रियकर तूं परममनोहरस्वभावमय राधे ॥ सखये
गे ॥ स्वभावमय राधे ॥ ध्रु० ॥ हे प्रिय भामिनि मजवि-
षयींचा ॥ त्याग करीं तूं दोषचि साचा ॥ त्रास होतसे
मज मदनाचा ॥ चुंबन दे गे ह्मणुनी ॥ राधिके० ॥ १ ॥
राधे तूं जें भाषण करिसी ॥ दंतप्रकाशें सकलां निरखि-
शी ॥ अंधःकारातें तु गे हरिसी ॥ ऐसी सुखदाती ।
सखये० ॥ २ ॥

## पद. (शुद्ध कामदा )

वदनचंद्रमा माझिया करी ॥ नयनपक्षियां वृद्धि स-
त्वरी ॥ अधर अमृता जन्मवी बरें ॥ म्हणुनि रोहिणी-
नाथ तूं खरें ॥ १ ॥

## पद.

चाल—( वस्त्रानें देह सारा सुंदरिनें झांकिला )

माझ्या या लोचनांसी निरखाया सुंदरी ॥ वदनेंदू तुझा

राधे रमणिय रतिमंजरी ॥ ध्रु० ॥ जरि करिसी कोप भारी मजवरतो मारदे ॥ निजहस्ते आलिंगूनि भवसिंधु पार दे ॥ तुजसम ती अन्य नाहीं सुकुमारी मारदे॥ चाल ॥ किति विनवुं तुजलागी जातों मी गव्हरीं ॥ माझ्या या० ॥ १ ॥ भूषण तूं होसि माझें जीवन तूं राधिके तूं माझें भवाब्धीचें रत्नचि गे राधिके ॥ दिनरजनी सानुकुल राही मज राधिके ॥ चालप० ॥ सांगसि जें करिन तसें वागेन मी झडकरी ॥ माझ्या या लो० ॥ २ ॥ तुझे नेत्र रक्त झाले कज्जलानें कृष्ण ते ॥ क्रोधानें लाल भासे रुद्राचें रूप तें ॥ रंगवावें कमलरूपा हें वदतों साच तें ॥ चाल ॥ मन्मथाचा बाण भावें कृष्णवर्ण हा धरी ॥ माझ्या या० ॥ ३ ॥ शृंगारसूरासि योग्य अनुरूप जें पाहणें क्रोधानें त्यागि तेची वदताती शाहणे ॥ कटाक्षानें निरखि भावें दाउनियां बाहणें ॥ चाल प० ॥ तवनेत्रीं मदन बाण उपजे तो धरि करीं ॥ माझ्या या ० ॥ ४ ॥

## दिंड्या.

रक्तवर्ण नेत्रांसि योग्य नाहीं ॥ कुचकुंभावरी रत्नहार पाहीं ॥ नको त्यागूं भूषणें अर्पितों हीं ॥ जरी झाले अपराध तरी साही ॥ १ ॥ हार शोभो तवकुचप्रदेशीं हा ॥ कटीवरतीं मेखलाही महार्हा ॥ किंकिणीचा रव मधुर मन्मथाज्ञे ॥ करो घोषित युवजनां, अगे सुज्ञे ॥ २ ॥

## घनाक्षरी.

अतिकोमल मम वाणी ॥ कां गे त्याजिसी सौख्यखाणी ॥ रंजवि प्रेमहृदयस्थानीं ॥ ऐसे चरण युगुल जें ॥ १ ॥ त्यातें सांद्र शोभायुक्त ॥ लाक्षासुरसीं रंजित ॥ देऊं काथ करुनी त्वरित ॥ रक्तवर्ण भाभिनी ॥ २ ॥ रतिरंग समयीं फार ॥ परभाग मनोहर ॥ शोभे अलक्तक साचार ॥ तणें

त्वरित शोभसी ॥ ३ ॥ क्रौंच बंधामाजि विमल ॥ राधे बहुत शोभतील ॥ तुझे चरण हे कोमल ॥ आतां किती रूसशी ॥ ४ ॥

## पद.

चाल—( केशव करणी अघटित लीला नारायण तो कसा.. )

मदनफणीचें विष मम अंगीं व्यापुनि गेलें खरें ॥ तयानें प्राण झाले घावरे ॥ ध्रु० ॥ तव पदपल्लव हे अतिकोमल, ठेविशि माझ्या शिरीं ॥ तरी मी धन्य मानि सुंदरी ॥ भूषण होइल तें मम मस्तकिं, मंडन जें साजिरें ॥ जयानें स्मरविषबाधा हरे ॥ माझ्या हृदयीं मदनाग्नीचा ताप होतसे महा ॥ राधिके प्रेमानें मज पहा ॥ १ ॥ मदन० ॥ २ ॥

## साकी.

तव मुखचंद्रा निरखुनि माझ्या नेत्रचकोरालागीं ॥ अधरामृत तें पान कराया लोभाचि उपजे वेगीं ॥ शशि-परि दीप्ती दंतांची ॥ दिसते शोभा ती साची ॥ १ ॥ ह्या दासावरी कोप करिसि तूं तरि मग ऐसें करगं ॥ नख-लक्षण शर तीक्ष्ण तयानें ताडण करि मज वेगें ॥ दृढतर भुजबंधन करुनी ॥ पीडीं मज हृदयीं धरुनी ॥ २॥

## दिंडी.

दंतयोगें करि ओष्ठखंडनातें ॥ स्तनें पीडा करि सांग मंडणातें ॥ मारसंगर करि मजासि, सुखें पाही ॥ मन्म-थाग्नी करि शांत, देहदाही ॥ १ ॥

## श्लोकः ( मालिनी )

भ्रुकुटिमय फणीतें पाहुनी भीत भारी ॥ तरुण पुरुष मानी कष्ट, सौख्यासि वारी ॥ तव अधर सुधाही सिद्ध मंत्रार्थ झाला ॥ उपशमन अहीं तें जाणुनी होय पाला ॥ १ ॥

## दिंड्या.

त्रासदायक मज मौन तुझें भासे ॥ तुझ्या कोमल भाषणें दुःख नासे ॥ वारि आतां तूं हृदयदाह माझा ॥ मला गांजितसे बहुत मदन राजा ॥१॥ नको बैसूं तूं पाठ मोरि·आतां ॥ स्नेहसंबंधा योग्य करी गाथा ॥ अतिस्नेहाळें तुझ्या निकट आलों ॥ नको अवमानुं बघुनि तुला धालों ॥ २ ॥

## पद.

चाल—( कलीस अशी काय परीक्षा तूं सखेगे )

कोपयुक्त राधिके तूं परिस हो गिरा ॥ ओष्ठलाल कुसुमपरी, वर्ण साजिरा ॥ ध्रु०॥ नेत्र तुझे नीलोत्पलसमाचि शोभती ॥ नासिका उदार, बघुनि शुकहि लाजती ॥ दंतकुंदकलिकापरि वदनिं भासती ॥ चाल ॥ पुष्पायुध आराधी मुखशशी बरा ॥ कोपयुक्त० ॥ १ ॥ तव योगें करुनि मदन विश्व जिंकितो ॥ भासे मज दैवत तूं ह्मणुनि प्रार्थितो ॥ व्यवसाया योग्य सदा त्रिजागिं डोलतो ॥ चाल ॥ मुखाश्रयें करुनि विजयि जाहला खरा ॥ कोपयुक्त ० ॥ २ ॥

## साक्या.

तव दृष्टी कां मंद जाहली आलस्यानें, तन्वी ॥ चंद्रबिंब सम त्वन्मुख देखुनि हा जन चित्ता रमवी ॥ तुझिया उरुंची शोभा ॥ पाहुनि लाजति कीं रंभा ॥ १ ॥ तव रति जी ती मजला गमते कामशास्त्र आधारें ॥ योग्य सदोदित, या महिवरि तूं घेइ सुखाचें वारें ॥ आतां काय करावें गा ॥ कैसा साहुं स्मर वेगा ॥ २ ॥

## दिंडी.

स्वर्गिच्या त्या अप्सरा आणि रंभा ॥ परमरमणीया

सुंदरी विविधशोभा ॥ चित्रलेखा ती कलावती नारी ॥ तशी भूवरि राधिका सुगुण नारी ॥ १ ॥ कुंभ पाहुनि कुलवयापीडमाथां ॥ राधिकेचे कुचकुंभ स्मरति चित्ता ॥ तया हस्तीसह झगडतां श्रांत झाला ॥ विसावा घे क्षण मिटुनि लोचनांला ॥ तयीं देखोनी घर्म हरी अंगीं ॥ २ ॥ कंस बोले तो " जितं जितं " रंगीं ॥ देह कंसा जो हरी क्षणिक तोष ॥ हरो भक्तांचे ताप तो अशेष ॥ ३ ॥

इति गीतगोविंदे प्राकृत टीकायां मानिनीवर्णने चतुर चतुर्भुजोनाम दशमःसर्गः ॥ १० ॥

श्री कृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंद सर्ग ११

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥

## दिंडी.

केशवानें जो वेष धरीयेला ॥ स्वयें सालंकृत रम्य बहुत ठेला ॥ सुखें राधेसी वदुनि सौख्य वार्ता ॥ लतागेहीं पातला कंसहर्ता ॥ १ ॥ अंधकारीं अदृश्य हरी ऐसा ॥ प्रदोषाचे समयांत कीरनासा ॥ कामिनीनें भूषणें लेववीलीं ॥ हरीलागी, राधिका कुपित झाली ॥ २ ॥

यानंतर राधे प्रति सखीचें भाषण.

## साक्या.

मूढे राधे, हा अनुसरला ऐसा माधव तुजला ॥ मधुमथना त्या अनुसर आतां कोटिमदनसा सजला ॥ कवण परित्रा तो आहे ॥ प्रेमें रचना जी पाहे ॥ १ ॥ कामातुर जो लीन जाहला तवचरणीं सद्भावें । ऐशा समयीं सुंदरवेतसकुंजगृहीं निरखावें ॥ क्रीडास्थानीं तो गेला ॥ ऐसा प्रकार हा झाला ॥ २ ॥

## दिंडी.

तुझ्यादेहीं स्तनभार बहुत झाला ॥ नूपुरातें वाजीव बघुनि त्याला ॥ मंदगतिनें त्वां हरीसमिप जावें ॥ हंसगमने तत्पदीं लीन व्हावें ॥ १ ॥

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें. )

रमणिय बहु तरुणिजनां मोह जो करी ॥ ऐसा हरी, मद्वचना परिस सत्वरी ॥ ध्रु० ॥ कोकिलसमुदाय मदन निपजवी खरा ॥ आज्ञेचा मान राखि जागवी स्मरा ॥

मदनातें गतियोगें समय साजिरा ॥ चाल ॥ अनुसर तूं हारिलि राधे सत्य वैखरी ॥ रमणिय० ॥ १ ॥

साकी.

मंदवायुनें तरुचीं पणें कैसीं चंचल होतीं ॥ बाहति तुजला भासे मजला, दर्शनिं सुख बहु देती ॥ आतां विलंब न करावा ॥ आहे गुरुवर अक्रावा ॥ १ ॥

ओंवी.

अचेतनवल्ली तुजलागुन ॥ प्रेरिती घ्यावया हरिदर्शन ॥ यास्तव करावया गमन ॥ विलंब न करी राधिके ॥ २ ॥

घनाक्षरी.

मदनवशास्तवाचि काय ॥ कंपित होउनी रहाय ॥ आलिंगूनि यादवराय ॥ कुचकुंभ शांतवी ॥ १ ॥ निर्मल मुक्तावली तीच ॥ निर्मल जलधारा साच ॥ ज्याचे ठायीं मणि पाच ॥ नसे काच कोणता ॥ २ ॥ कोपभरित राधे जाण ॥ सख्या पाहती प्रमाण ॥ तव शरीर सुखद पूर्ण ॥ सुरतसमरीं सिद्ध हें ॥ ३ ॥ मेखला करी शब्द फार ॥ रतियुद्धीं मनोहर ॥ वाद्य सरस वाजणार ॥ समारंभीं जाणिजे ॥ ४ ॥ लज्जा त्यजुनि दिवसरात ॥ नयनीं पाहे कृष्णनाथ ॥ होसिल मनें सदा शांत ॥ जगामाजि धन्य तूं ॥ ५ ॥

पद.

चाल—( अकुगाची )

मदनबाण परी ॥ सुंदर नखरेखा ही ॥ सखिहस्त धरी लवलाही ॥ ध्रु० ॥ नानालीलेनें चरित दाउनी जावें ॥ श्रीहरीचरण निरखावे ॥ कंकणशब्दानें सूचित हेंचि करावें ॥ हरिलागि आलें समजावें ॥ एकाग्रचित्तानें जपतो तुज त्यासि भजावें ॥ तच्चरितामृत मुखिं गावें ॥ श्रीजय-

देवानें गीत केलें सद्भावें ॥ हरिचरणीं लक्ष लागावें ॥ कंठीं गीताची माळ करुनि अर्पावें ॥ कामक्रोध सकल वर्जावे ॥ चाल ॥ शुद्ध चित्त करुनि संसारीं ॥ चिंतावा हृदि दनुजारी ॥ जन्ममरण हेंचि निवारी ॥ चाल ॥ श्रीहरि धांव त्वरें, कूर्मदृष्टीनें पाही ॥ सखिहस्त धरी० ॥ १ ॥

पुनरपि सखी राधेप्रति बोलते.

## साक्या.

येइल राधा, आलिंगुनि मज मधुर मधुर बोलोनी ॥ प्रेम निरीक्षण करुनी मजला रमविल कवणा स्थानीं ॥ ऐसें चिंतुनि लवलाहें ॥ श्रीहरि वाट तुझी पाहे ॥ १ ॥ ध्यानीं स्वप्नीं तूं त्या दिसशी, स्वेद पुलक मूर्छाही ॥ त्वद्वि-रहानें प्राप्त हरीला, भेटीची इच्छाही ॥ पुरवी आतां लव-ल हें ॥ श्रीहरि वाट तुझी पाहे ॥ २ ॥ तुजला स्मरुनी सौख्य मानितो, त्वद्विरहानें दुःख ॥ कुंजीं जाउनि पाहे तुजला, दिसशि न म्हणुनी शोक ॥ वारि तयाचा लवलाहे ॥ श्रीहरि वाट तुझी पाहे ॥ ३ ॥

## घनाक्षरी.

निकुंजांत अंधःकार ॥ चहूंकडे व्याप्त फार ॥ भ्रमणा अनुकूल साचार ॥ अभिसारिका स्त्रियांसी ॥ १ ॥ तो त्यांच्या अवयवांसी ॥ आलिंगितां सौख्य राशी ॥ नेत्रीं काजळ परियेसी ॥ श्रवणीं तमालपत्र तें ॥ २ ॥ मस्तकीं निलोत्पल जाण ॥ माळा गुंफिली प्रमाण ॥ स्तनीं कस्तु-रीनें पूर्ण ॥ पत्रिकाचि रेखिली ॥ ३ ॥ हृदयीं नील कंचु-कीस ॥ धारण राधे करितीस ॥ ध्वांत ऐसें हें सुरस ॥ यथासांग वर्णिलें ॥ ४ ॥

## साक्या.

हेम परीक्षा व्हायाकारितां घर्षण पाषाणातें ॥ करिती,

यापरि प्रेमपरीक्षा करि, वरि मधुसुदनातें ॥ आतां श्रीहरि ो पाहे ॥ राधे जा जा लवलाहे ॥ १ ॥ लोकवंचना रुनी जाते संकेतस्थानासी ॥ अभिसारिका असें जन हणती राधे ऐशा स्त्रीसी ॥ पतिची प्रेमपरीक्षा ती ॥ नेबिडहि आंधारी होती ॥ २ ॥ सौवर्णाची योग्य परीक्षा ाषाणावरि होते ॥ घर्षण करितां, तद्वत् हें तम असुखें ळउनि नेतें ॥ ऐसा महिमा जाणावा ॥ घ्या हरिचरिता- ृतमावा ॥ ३ ॥

## पद.

चाल—( पाहिन सिंहासनि राम माझा राजाराम० )

याउपरि त्या निकुंजगृहाच्या द्वारीं जाउनि राहिली ॥ ृषभानूची नंदिनी मोदें मूर्ति हरिची पाहिली ॥ ॥ ध्रु० ॥ ज्जित होउनि निजनिष्ठुरवच चित्तीं स्मरुनी त काळीं ॥ ाहली खिन्नचि तीप्रति बोले सखि वचनातें मधुर भली ॥ ाउपरि त्या० ॥ १ ॥ कुंजगृहामधि फांके प्रभा बहु हारा- लिच्या रत्नांची ॥ राधामाधव विलसति तेथें सन्मुर्ती ानंदाची ॥ याउपरि त्या० ॥ २ ॥ स्वर्णमेखला कांची ुर कंकणमणिमय दीप्तीनें ॥ झालें प्रकाशित ऐशा दर्नीं बोले सखि ती प्रीतीनें ॥ याउपरि० ॥ ३ ॥

## पद.

चाल—( नंदगृहाच्या जवळि मुलांनो आहे रथ हु० )

अतिसुंदर ह्या रमणिय क्रीडाभुवनीं हरि आहे ॥ राधिके, वनीं हरि आहे ॥ ध्रु० ॥ मंदस्मित मुख हें तव प्रमदे ॥ रतसुखाचा अनुभव त्या दे ॥ विलासवति हे भामिनि, ाधे ॥ कलहा न करी तूं ॥ हरीशीं ॥ १ ॥ राधे तुझ्या या चकलशांवर ॥ आहे विराजित चंचल हार ॥ अशोक लवि शय्या सुंदर ॥ केली या कुंजीं ॥ राधिके ॥ केली०

॥ २ ॥ कुसुमापरि तवदेह सखेगे ॥ कुसुमीं शय्या रचिलि पहा गे ॥ विराजित हो, निजतनु वाहा गे ॥ माधवरायासी ॥ निजतनु माधवरायासी ॥ ३ ॥

## साकी.

ललितगीत तूं जाणशि राधे, कंठ तुझा बहु मधुर ॥ मलयगिरींहुनि वायू वाहे मंद सुगंध सनीर ॥ जाई कुंजीं यासमयीं ॥ भोगी भोगि शेषशायी ॥ १ ॥ चारुनितंबे विलासचतुरे रतिरमणीये राधे ॥ भ्रमरसमुह गुंजारव करिती, इष्ट होति मकरंदें ॥ ऐशा कुंजीं या समयीं ॥ भोगी भोगि शेषशायी ॥ २ ॥

## दिंडी.

दंतपंक्ती बहु रुचिर तुझी भासे ॥ रत्नकीलक मस्तकीं तो विलासे ॥ अशा शोभे मडीत राधिके गे ॥ लतागेहीं तूं त्वरें सुखें जा गे ॥ १ ॥ वसंताच्या दर्शनें करुनि राधे ॥ कोकिलांचे मृदु शब्द सुखद साधे ॥ होति सुंदर पोशिया लतागेहीं ॥ जाइ प्रीतीनें, माधवालागे पाही ॥ २ ॥

## पद.

चाल—( तुझ्या गृहा नेई ॥ राधे तुझ्या गृहा नेई ॥ राहिना गोविंद राधे तुझ्या० )

तुला हृदयीं वाहे ॥ राधे तुला हृदयीं वाहे ॥ मानुनिया देवा परी ॥ ध्रु० ॥ अखंडित करितो ध्यान ॥ भार वाही झाला पूर्ण ॥ परिश्रम झाला जाण ॥ शांत तूं करी तया ॥ राधे० ॥ १ ॥ कामशरें तप्त झाला ॥ चुंबनार्थ नाहीं घाला ॥ अंकीं बैसुनिया त्याला ॥ सुख देई क्षणभरी ॥ राधे० ॥ २ ॥ साशंकित जवळी जाया ॥

ोऊं नको आतां वायां ॥ कटाक्षानें रमवी तया ॥ नसे ्रम त्यास कीं ॥ राधे ॥ तुला हृदयिं वाहे ॥ ० ॥ ३ ॥

मग राधा हरीकडे जाऊं लागली त्याचें वर्णन करितात.

चाललि मग ती राधा, मंजुळ वाजवीत नुपुरातें ॥ ्तिशास्त्रमधिं निपुण बहुन जो, हरिला बहु सुखदा ते ॥ ्रेसें हरिमन वळवावें ॥ ऐसें चिंतन करि भावें ॥ १ ॥ ्रिवदनातें चंचलनयनें करुनि राधिका पाहे ॥ हाव- ्गावयुत सप्रमानें, मन्मथ हृदयीं राहे ॥ रतिसंग्राम करा- यासी ॥ सुखवाया तो हृषिकेशी ॥ २ ॥

## पद.

चाल— ( उद्या बघ जातें ॥ नृप सिंहासन रामातें. )

राधिका पाहे ॥ माधवासि मग लवलाहे ॥ ध्रु० ॥ कन्च- णेपरिचा श्रीहरि असे ॥ राधेसंनिध प्रेमें विलसे ॥ चिर- काळ विलासीं वसे ॥ चाल ॥ सुखान्वित राहे ॥ माधवा० ॥ १ ॥ हर्षे युक्त स्मित मुख ज्याचें ॥ वसति- स्थानचि जो मदनाचें ॥ चंद्रदर्शनें जें सिंधूचें ॥ भरतें वाहे ॥ माधवासि० ॥ २ ॥ राधादर्शनमात्रें जाण ॥ तृप्त मनामधें श्रीभगवान ॥ नानाविचाररचना पूर्ण ॥ योजित आहे ॥ माधवासि० ॥ ३ ॥

## पद.

चाल—( केशव करणी अद्भुत लीला नारायण० )

निरखी राधा देवकिनंदन प्राणांहुनि प्रियकर ॥ श्याम- सुंदररुप मनोहर ॥ ध्रु० ॥ कालिंदीचा फेनसमुह जो नेणेंकरुनि भरपुर ॥ जसा काय यमुनेचा तो पुर ॥ उरः- स्थळावरि , कुसुमहारातें आलिंगुनि परिकर ॥ धरितो स्वच्छंदें तनुवर ॥ नीलवर्णमेघापरि निर्मळ स्वरुप ज्याचें

सुंदर ॥ जसा काय फेसाचि यमुनेवर ॥ चाल ॥ तैसा हार विलसे, पीतांबर भरजरी ॥ श्यामदेहावरती शोभा दाखवी बरी ॥ परागसमुदायें वेष्टिलें भूळ वरिवरी ॥ चाल ॥ नीलतनुवरि पीतपीतांबर शोभे तो सुखकर ॥ वंदितो भावें धरणीधर ॥ १ ॥

## साकी.

पाहुनि माधव सात्विकभावें राधा तल्लिन झाली ॥ सन्निध येउनि प्रेमानंदें आलिंगुनियां घाली ॥ राधामाधव यश गावें ॥ प्रेमें निशिदिनिं सद्भावें ॥ १ ॥

इति श्रीगीतगोविंदे प्राकृतटीकायां सानंद गोविंदोनाम एकादश सर्गः ॥ ११ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

# गीतगोविंद सर्ग १२



श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ अथगीतगोविंद नवमसर्गप्रारंभः ॥

पद. ( राग सारंग )

चाल—( धन्य उषाही बाणकन्यका अतिलाव० )

सखिजन बाहिर गेला असतां अतिशयलज्जायुक्त बरी ॥ मदनशरांनीं तप्त मनीं बहु वृषभानूची ती कुमरी ॥ ध्रु० ॥ मंदमंदहास्यानें दोन्ही अधर स्फुरती, धीर नसे ॥ नव कोमल तरुपल्लव पसरुनि शय्या रचिली बहु विलसे ॥ सानुराग मन जीचें ऐसी प्रियकरभामिनी आलि असे ॥ कमललोचनी हंसगामिनी नवयुवती ती निकट वसे ॥ चाल ॥ अवलोकुनियां ऐसि राधिका भाषण करि तिस दनुजारी ॥ सखिजन बाहिर गेला असतां अतिशयलज्जायुक्त बरी ॥ मदनशरांनीं तप्त मनीं बहु वृषभानूची ती कुमरी ॥ १ ॥

यानंतर श्रीहरीचें राधेप्रति भाषण.

पद.

चाल—( साध्य नसे मुनिकन्या ॥ परि मन वेडें ऐकत नाहीं. )

अनुकूल माधव मी ॥ राधे तुजला दिनरजनी गे ॥ ध्रु० ॥ यासमयीं तूं अनुसर मजला ॥ तुजसाठीं हा जन बहु श्रमला ॥ किसलयशयनीं तव पदकमला ॥ स्थापन उपरी करीं ॥ राधे तुजला दिनरजनी गे ॥ अनुकूल माधव मी ॥ १ ॥ रिपुसम शय्या मानूनि प्रमदे ॥ ठेउनिया

पद हिजला श्रम दे ॥ हेंचि उचित तुज मज रति सुखदा॥ व्याकुळ झालों बहु ॥ राधे० ॥ २ ॥ हे राधे, दुर आलिस म्हणुनी ॥ तवपदसेवा करितों जाणुनी ॥ सेवेला मी शूराचि गणुनी ॥ मंजुळ बोल मशीं ॥ राधे० ॥ उपकृति करि मजवरती राधे ॥ जेवीं चरणा नूपुर राधे ॥ प्रतिकृति करितों तदुपरि राधे ॥ करितों विनति तुला ॥ राधे० ॥ ३ ॥

## दिंडी.

तुझ्या वदनांतूनि मधुर मधुर वाणी ॥ अमृताचे परि निघत सौख्यखाणी ॥ बोल मजसीं राधिके, डोल आतां॥ किती गाऊं तरि वाणुं तुझी गाथा ॥ १ ॥

## साक्या.

कंचुकिची ही ग्रंथि सोडितों मूक्त पयोधर व्हाया ॥ आलिंगन दृढ करुं दे, माझा प्रखर विरह शमवाया ॥ साधन सोपें मज आहे ॥ सखये प्रेमानें पाहे ॥ १ ॥ पुलकांकित पति आलिंगाया कुच हे सन्मुख आले ॥ माझ्या वक्षस्थळीं तयांतें स्थापन करि वेल्हाळे ॥ हृद्गत कामाग्नी शांत ॥ होइल राधे निभ्रांत ॥ २ ॥ हें सुख दुर्लभ स्वर्गी अमरां ऐसें निश्चित जाण ॥ हे प्रिय स्वामिनि, दे दे मजला तव अधरामृतपान ॥ विरहाग्नीनें मन जळलें ॥ त्यातें वाचवि तूं वाहिले ॥ ३ ॥ संकटसमयीं दीन जनांचे थोरचि करिती त्राण ॥ दास तुझा मी उदास विरहे, अधरें वाचवि प्राण ॥ किती तरि विनवी हा दीन ॥ दे दे अधरामृतपान ॥ ४ ॥

## दिंडी.

चंद्रवदने तव कंठ ध्वनित आहे ॥ मेखले परि ध्वनी

मधुर राहे ॥ कोकिलांचा रव विरहकाळिं भारी ॥ मला दुःखद होतसे तो निवारी ॥ १ ॥

## पद.

चाल—( काय मला भूल पडलि भान हरपलें )

कोप करुनि मजसि तुवां व्यर्थ दुखविलें ॥ त्या मंज अज निरखि स्वयें बोलतां भलें ॥ ध्रु० ॥ पश्चात्ताप पाउनि तूं काय लाजसी ॥ नयनकमलें आच्छादुनि काय टाकिसी ॥ केलिदैन्य त्याग करी काय पाहसी ॥ चाल ॥ जयदेवें रसिकजनां गीत अर्पिलें ॥ कोप करुनि० ॥ १ ॥

## साकी.

त्या सुरताच्या प्रारंभीं बहु गाढालिंगन करितां ॥ रोमांचोदय होतां घडलें सौख्याहुनि विपरीता ॥ विघ्नरूपाचि तें झालें ॥ दंपतिमानस नच धालें ॥ १ ॥

## पद.

चाल—( वाहवा थोर तु भूपाला० )

वाहवा अभिनव लीलांची ॥ अद्भुत महिमा सुरताची ॥ ध्रु० ॥ प्रथमारंभीं प्रेमभरानें निरीक्षण हें करणें ॥ ऐसें करितां नेत्रपातिचें विघ्न वाटे अवमानें ॥ वाहवा० ॥ १ ॥ अधरामृत जों पान करावें, माजि घडे तो साचा ॥ अंतराय बहुभाषण, कांहीं स्वल्पभाग विनोदाचा ॥ वाहवा० ॥ २ ॥ राधामाधव सुरतारंभीं ऐसा भाव प्रगटे ॥ कामचरित हें वामचि आहे, राधे माधव भेटे ॥ वाहवा० ॥ ३ ॥

## दिंडी.

कामयुद्धाचे ठायिं राधिकेनें ॥ बाहुबंधीं बांधिला हरी यत्नें ॥ आलिंगाला हा अर्थ उग्रेड आहे ॥ स्तनभारें

पीडिला तया पाहे ॥ १ ॥ नखें करुनी त्या विदारिला साच ॥ आत्मदंतें क्षतओष्ठ करुनि जाच ॥ स्वयें केला त्या अधरपुटीं भारी ॥ कटीभागें हाणिला पूतनारी ॥ २ ॥ केशबंधा करिं धरुनि आंवळीला ॥ तर्यी अधरामृतरसें मोहियेला ॥ कांतमाधव विपरीतरतीमाजी ॥ गती कामाची विपरीत गाजी ॥ ३ ॥ तयायोगें हा उपद्रवो सारा ॥ कसें मोहियलें पहा वेदसारा ॥ सुखें गावें तच्चरित मुखें आतां ॥ भवसिंधुमधि तरणि हरीगाथा ॥ ४ ॥

## पद.

चाल—( अभाग्याचे घरिं बाबा कामधेनू आली. )

कामरतीचे ठायीं राधा जिंकाया पाहे ॥ रमाधवासी विपरित रतिचा भाव करुनि राहे ॥ ध्रु० ॥ मदनाचें हें चिन्हरूपची सुरताची केली ॥ अनिर्वाच्य, अविचारें आरंभीं पाहत वनमाली ॥ १ ॥ जघनस्थानीं निश्चल जाहली बाहूवल्लि शिथिल ॥ धडधडधडधड वक्षस्थळ करि झांकि नेत्रकमल ॥ कामरतीचे० ॥ २ ॥ पराक्रम तो किति युवतीचा अग्रभागिं चाले ॥ पुरुषाच्या, जाणूनि कामना अपूर्ण नच हाले ॥ कामर० ॥ ३ ३ ॥ शेवटिं जाहली पराभूत वृषभानूची दुहिता ॥ तो परमात्मा अजिंक्य समजुनि गाती मुनि चरिता ॥ काम० ॥ ४ ॥

## श्लोक. ( शुद्धकामदा. )

सुरतखेळ तो खेळतां भला ॥ उदय भानुचा शीघ्र जाहला ॥ अरुणचिन्ह तें शोभलें उरीं ॥ बहुतजागरणें धुंद सुंदरी ॥ १ ॥

## दिंडी.

चुंबनानें क्षाळिला अधर सारा ॥ राधिकेचा, जी

स्खलितपुष्पहारा ॥ केश वेणीचे जवि शिथिल पाहे ॥ तव नारीचें तवि शिथिल राहे ॥ १ ॥

## ओंव्या.

नखक्षतादियुक्त ॥ वक्षस्थलअधरनेत्रपद्मवत ॥ केश-मेखला या संयुत ॥ मन्मथबाणजाणावे ॥ १ ॥ प्रातः-कालीं ऐसे शर ॥ राधेनें स्थापिले मनोहर ॥ पतिनेत्रा-वरी सत्वर ॥ क्षण तया न लागतां ॥ २ ॥ त्याहीं पतीचें मन वेधिलें ॥ कैसे नेत्रीं आरोपिलें ॥ बाण मनातें विंधित झाले ॥ हेंचि आश्चर्य वाटतसे ॥ ३ ॥

## साक्या.

"क्षीरोदाधिच्या काठीं बैसुनि पूर्वीं त्वां तप केलें ॥ मजसि वरावें नच अन्या, हें त्वां मानसिं दृढ धरिलें ॥ शंकर वेडा इच्छि तुला ॥ परि तूं इच्छिसि ना त्याला ॥ १ ॥ म्हणुनि तयानें कालकूटविष प्राशन केलें रागें ॥" ॥ राधेचें मन आकर्षाया हार तिस गोष्टी सांगे ॥ गुज-गोष्टींचें मिष करुनी ॥ ओढी तिस पदरीं धरुनी ॥ २ ॥

## दिंडी.

राधिकेच्या हृदयवामभागीं ॥ करें ओढी हरि पदर त्या प्रसंगीं ॥ स्तनावरती फिरवीत दृष्टि भावें ॥ तोचि रक्षो हरि तुम्हां चरित गावें ॥ २ ॥

## पद.

चाल—( संजय तात्काळ निघाला ॥ काम्यकव० )

केशसमुह तो विखुरला ॥ अस्ताव्यस्त बहुत झाला ॥ चूर्णकुंतल तो बहु चळला ॥ स्थाना पासुनियां ॥ १ ॥ गल्ल प्रफुल्लित व्यापियलें ॥ घर्मानें बहु डवडविलें ॥ दंतें

करुनी अधर खंडिले ॥ वैभव स्पष्ट गमे ॥ २ ॥ स्तनकलशा या दीसोनें ॥ हारलतिका प्रेमानें ॥ जिंकिली कीं त्या अभिमानें ॥ विगलित दामचि हा ॥ ३ ॥ ऐशा आपुल्या स्वरुपासी ॥ पाहे राधा सुखराशी ॥ लज्जेनें स्तन जघनांसी ॥ आच्छादी तेव्हां ॥ ४ ॥ ऐसि राधिका कृष्णासी ॥ विठ्ठल करि त्या समयासी ॥ स्रग्धरेचिया छंदासी ॥ गाइयलें प्रेमें ॥ ५ ॥

## साक्या.

कामजनित त्या निःश्वासानें चंचल स्तन जे कांहीं ॥ आलिंगनानें हर्षाचा बहु उत्कर्षचि तो पाही ॥ तेणें अशक्ती झाली ॥ राधासुंदरि सुखवल्ली ॥ १ ॥ इषन्मीलितदृष्टी कांहीं त्रस्त संकुचित नयनें ॥ ज्यांत्र ठायीं सीत्काराची हे परंपरा बहुमानें ॥ अस्पष्ट संभ्रमयुत होती ॥ क्रीडमाजि रसिक रमती ॥ २ ॥

## ओंव्या.

शब्दविकारें तियेचे ठायीं ॥ प्रगट दंतकिरण जे त्यांहीं ॥ व्यापिला अधर जया ठायीं ॥ अरुणसम वर्णानें ॥ १ ॥ ऐसें शोभलें सुंदरवदन ॥ त्यातें सुकृती पुरुष तोचि पूर्ण ॥ हर्षे करूनि घेई चुंबन ॥ प्रेमभावें धरोनियां ॥ २ ॥ यानंतर हास्ययुक्त ॥ खिन्नांगी जाहली राधा बहुत ॥ सुरतांतीं आनंदभरित ॥ होती जाहली ते काळीं ॥ ३ ॥ हर्षभरित होऊनि जाण ॥ श्रीहरीसी राधा बोले वचन ॥ तेंचि परिसा श्रोतेजन ॥ श्रद्धा मनीं ठेउनियां ॥ ४ ॥ जो आनंदवी हृदयासी ॥ ऐसा यदुनंदन हृषीकेशी ॥ क्रीडत असतां तयासी ॥ बोलती जाहली राधिका ॥ ५ ॥

## श्लोक. ( कामदा )

राधिका म्हणे एक माधवा ॥ लावि चंदनालागि

येथवां ॥ या स्तनीं लिहि चित्रकस्तुरी ॥ आपुल्या करें आजि सत्वरी ॥ १ ॥ कुंभबंधु हा मंगलार्थ कीं काम अस्र भो नाहिं व्यर्थ कीं ॥ त्यापरी सख्या कामबाण ते ॥ सोडणार हे नेत्र जाण ते ॥ २ ॥

## साक्या.

भृंगाहुनि बहु कृष्णवर्ण जें ऐसें काजळ घालीं ॥ माझ्या नेत्रीं प्राणसख्या तूं यदुनंदन वनमाली ॥ हेतू पूर्ण करीं आतां ॥ तुजविण नाहीं मज त्राता ॥ १ ॥ मदन पाश जो विलास त्याच्या समान लीला धरिती ॥ ऐशीं माझीं उभयकुंडलें श्रवणीं घाली हरि तीं ॥ हेतू पूर्ण करी माझा ॥ हे मम प्रियकर यदुराजा ॥ २ ॥ कमलावरती भ्रमर बैसती तैसे वदनावरती ॥ केश विखुरले सांवरि त्यातें शोभिवंत ना दिसती ॥ वृषभानूची ती बाळा ॥ विनवी कृष्णा वल्हाळा ॥ ३ ॥

## पद.

चाल—( आला वनमाळी० )

घर्मबिंदु प्रक्षाळुनि॥ शुद्धभाळिं रेखी आतां ॥ अर्धचंद्र जेवीं गगनीं ॥ तेवि रची तूंचि स्वतां ॥ ध्रु० ॥ तिलक रेखि कस्तुरीचा ॥ जेणें शोभा येई मला ॥ लाक्षारस लावी पदां ॥ माझिया तूं श्यामला ॥ घर्मबिंदु० ॥ १ ॥ मयुर-पिच्छमुकुट शिरीं, ज्याचिया शोभतसे ॥ ऐसा हरि राधिकेचा ॥ केशपाश गुंफीतसे घर्म० ॥ २ ॥

## वेणी.

चाल—( अक्रुराची )

जय जय जगदीशा, भो केशव वनमाळी ॥ राधा म्हणे वेणि तूं घाली ॥ ध्रु० ॥ पुढें घेउनियां बैस आतां शेजारीं ॥

करि पूर्ण कामना सारी ॥ केश मस्तकिंचे, विंचरुनीयां स्वकरीं ॥ काढि मळ सकळ तनुजारी ॥ सुगंध तैलानें सांवरुनी तिनपदरी ॥ घालि वेणि सुंदर मुरहारी ॥ करि भूषित मज जगतीवरि कंसारी ॥ सदा चिंती तुज कामारी ॥ चाल ॥ कनकनग गुंफि ठायिंचे ठायीं ॥ जातिपुष्पं मालती तेही ॥ चंद्रसूर्य बिजवरा तोही ॥ चाल ॥ कुंकुम-टिकली ती लावि स्वयें मम भाळीं ॥ राधा म्हणे वेणी तूं घाली ॥ जयजय० ॥ १ ॥

## ठुंबरी.

चाल --( मोहनरसिया. )

कुसुमरहित मम केशपाश हा सुरतप्रसंगीं जाहला देवा ॥ यास्तव आतां सुगंधसुमनें आणुनि गुंफुनि नीट करावा ॥ ध्रु० ॥ कामनिवासस्थळ पेशा मम जघनप्रदेशीं लेवविं वसना ॥ रत्नजडित कटिभूषण बांधुनि धारण करवीं मज मधुमथना ॥ १ ॥ कुचलकशांवरि केशरचंदनविरचित काढी चित्रविचित्रा ॥ पत्रांची रचना ती सुंदर, तैशी गल्लीं त्रिजगपवित्रा ॥ २ ॥ हरिपदचिंतन भवभयमोचन शुभकारक जयदेववचन हें ॥ भक्तजनातें तोषउ भावें ज्यांच्या हृदयीं हरि वसताहे ॥ ३ ॥

यानंतर ग्रंथांतीं कवि मंगलाचरण करून कथेचा उपसंहार करितात.

## दिंड्या.

मारियेले कंसादि दुष्ट राजे ॥ कीर्ति ज्याची त्रैलोक्य भरी गाजे ॥ "प्रीतपीतांबर" नाम ज्यासि साजे ॥ स्तुती गातां शेषही थके लाजे ॥ १ ॥ क्षीरसागरिं फणि नाथ तो विराजे ॥ तयामस्तकिं मणिपंक्ति बहुत साजे ॥ वासुदेवाचें प्रतिबिंब तयेमाजी ॥ असा माधव संरक्षु तुम्हां-स्याजी ॥ २ ॥

## साक्या.

रामादेवी भोजदेव हीं मातापितरें ज्यातें ॥ त्या जयदेवें शृंगारात्मक रचिलें काव्यातें ॥ ॥ पराशरादि प्रियशिष्यांच्या कंठीं भूषणभूत ॥ काव्यमनोरम, अन्य रसिकही कां न तया वाचोत ॥ ॥

## श्लोक. ( शिखरिणी. )

सदा प्रेमें गावी हरिचरित खाणीच बरवी ॥ मनामाजी जी कां बहुतचि नरालागि शमवी ॥ महाश्रद्धा तेथें भवभय नसे, वाणिति कवी ॥ कृती सत्काव्याची बघुनि सुजनां लागि रमवी ॥ ३ ॥

## श्लोक. ( अनुष्टुप् )

गीर्वाणीं गीतगोविंद गानशृंगारसागर ॥ जयदेवकृती भव्य कवी व्युत्पन्न जाणती ॥ १ ॥ म्हणोनी प्राकृतीं केली टीका "मंगलदीपिका" ॥ गद्यान्वयसमायुक्ता कोंकणस्थें "महेश्वरें" ॥२॥ सदाधारें सखारामें नाना पद्यें करूनियां ॥ रचिलें गीतगोविंद, बुध हो पाहणें तया ॥ ३ ॥

इति श्रीगीतगोविंदे प्राकृतपद्यपटीकायां प्रीतपीनांबरो नाम द्वादश सर्गः ॥ १२ ॥

